ॐ श्रीगणेशाय नमः । मुद्गल सांगती दक्षाप्रत । महाभाग धर्मप्रिय नृप पुरूवंशांत । यज्ञकर्ते सदा धर्मरत । चरित्र वर्णन अशक्य त्यांचें ।।१।। ऐशा या नृपपरंपरेत । शंतनु नाम नृप विख्यात । धर्मशील प्रजापालनरत । त्याचा पुत्र भीष्म नामा ।।२।। श्रेष्ठ तो धर्म परायण असत । गंगेचा सुत पाळी ब्रह्मचर्यव्रत । शास्त्रज्ञ तो प्रख्यात । सत्यवती त्याची सापत्न माता ।।३।। सत्यवतीपासून शंतनूस प्राप्त । दोन पुत्र जे विख्यात । चित्रांगद महाबाहू नामवंत । विचित्रवीर्य नाम दुसरा ।।४।। चित्रांगद महातेजयुक्त । क्षत्रियांशी स्पर्धा करित । चित्रांगद गंधर्वाशी लढत । युद्धांत त्या मृत्यु पावला ।।५।। विचित्रवीर्य क्षयरोगें पीडित । रोगदोषें त्या तो मृत । त्याचे सुहृद बहु दुःखित । त्याच्या पत्नी दोन होत्या ।।६।। काशीराजाच्या त्या सुता । अंबिका अंबालिका दुःखिता । वैधव्याग्नींत पोळता । म्लानवदन त्या दोघी ।।७।। सत्यवती तेव्हां स्मरण करित । आपुल्या व्यास पुत्राचें मनांत । वंशवृद्धीस्तव संतान प्राप्त । व्हावें सुनांना म्हणोनी ।।८।। व्यास प्रकट होऊन विचारित । माते तूं कां दिससी दुःखित । दुःखनाश तुझा करीन त्वरित । यांत कांहीं संशय नसे ।।९।। सत्यवती व्यासास सांगत । विचित्रवीर्याच्या विधवा असत । नियोग नियमें होई रत । त्यांच्या संगे वंश वाढवी ।।१०।। ही माझी आज्ञा मानून । आतां न करी अनमान । तेव्हां व्यासें मातृवचन । शिरोधार्य मानलें ।।११।। कुत्सित वेष धारण करित । रात्रीं विधवा राण्यांस भोग देत । महामुनी तो वंशवृद्धी करित । आपुलें वीर्यबीज पेरूनिया ।।१२।। मुनीच्या वीर्यगुणें अंबिका लाभत । धृतराष्ट्र हा थोर सुत । अंबालिकेसी जो झाला सुत । त्याचे नांव पांडु ऐसें ।।१३।। त्या राण्यांच्या दासीपासून । व्यासवीर्यें विदूर जन्मून । यमधर्में देह त्या रूपें घेऊन । मांडव्य शाप भोगिला ।।१४।। दक्ष विचारी मुद्गलाप्रत ।

मांडव्यशाप यमास प्राप्त । कोणत्या कारणें पूर्व काळांत । तें सर्व सांगा मजला ।।१५।। धर्ममार्गी न्याय देत । प्राणिमात्रांसी सम असत । ऐसा तो यमधर्म कां लाभत । मांडव्याचा शाप पूर्वीं ।।१६।। मुद्गल दक्षास सांगती । जाणतों उत्सुकता तव चित्तीं । बरवा विचारलास प्रश्न मजप्रती । ऐक कथानक पुरातन ।।१७।। एकदा मुनिवर्य मांडव्य वनांत । बैसला होता मग्न तपांत । तेथ धन चोरून चोर येत । राजपुरुष करिती पाठलाग ।।१८।। जेव्हां राजाचे वीर मुख्य येत । रात्रीं त्या स्थानाप्रत । धन टाकून चोर पळत । मुनीच्या सन्निध त्या वेळीं ।।१९।। राजदूत धनराशी पाहती । मुनीच्या समीप भूमीवरती । मांडव्याचा तिरस्कार करिती । मौन भावें जो बैसला ।।२०।। त्यास पकडून मारिती । आपुल्या नगरा घेऊन जाती । राजास धन देऊन सांगती । चोराचा त्या वृत्तान्त ।।२१।। तें ऐकतां राजा कुपित । होऊन आज्ञा तेव्हां करित । या चोरास शिक्षा द्या त्वरित । राजसेवक हातांत शूल ठोकिती ।।२२।। त्या समयीं दुःखसमायुक्त । मांडव्य ऋषि तप करित । कश्यपा सृष्टिकारकासी स्मरत । आपुल्या गुरूसी चित्तांत ।।२३।। स्मरण करताचि प्रकटत । कश्यप तत्काळ पुढ्यांत । पाहून मांडव्यासी दुःखित । म्हणे तूं भज गणनायकासी ।।२४।। तो सर्व विघ्नांचा निहंता । भक्तांसी शांतिदाता । त्याचें भजन करण्या तत्त्वतां । कोणता मार्ग ते सांगा ।।२५।। मांडव्याचा प्रश्न ऐकून । कश्यप त्यासी सांगे वचन । गणेशाचें स्वरूप महान । भक्ती करण्या जें सुखदायक ।।२६।। पंचधा चित्तवृत्तीचा चालक । तो हा चिंतामणि पावक । गजानन वेदान्तीं ख्यात एक । ऐक रहस्य गजदेहाचें ।।२७।। संप्रज्ञात स्वरूप देह असत । असंप्रज्ञात तें शिर वर्तत । म्हणोनी गजवक्त्र हा ज्ञात । भ्रमरूपा महामाया ।।२८।। तीच गौणी सिद्धी जगांत । भ्रमधारक रूपा बुद्धि असत । त्या

सिद्धिबुद्धींचा स्वामी असत । योगाकार गणाधीश ।।२९।। ऐशा योगविधानेन भजशील । योगशांतिमया शरण जाशील । तरी मांडव्या विघ्न हरेल । तुझें यांत संशय नसे ।।३०।। ऐसे सांगून तया देत । एकाक्षर विधानें गणेश कवच अद्भुत । निरोप घेऊन कश्यप जात । आपुल्या गृहीं त्यानंतर ।।३१।। मांडव्य विघ्नेशासी भजत । जैसें कश्यप विधान सांगत । गणराजाचें कवच घालित । पीडाहीन तेणें झाला ।।३२।। कोण्या कार्यास्तव येत । महाविप्रासी त्या पाहत । हात जोडूनी प्रणाम करित । राजा भयभीत जाहला ।।३३।। रडूं लागला पाहून अघटित । म्हणे ही काय घडली मात । महामुनीस सुळीं दिलें नकळत । घोर पाप हें असे ।।३४।। मांडव्य त्यासी तेव्हां म्हणत । म्हणे महीपाला मीं शाप न देत । रडूं नको तूं न होय दुःखित । माझ्या कर्मदोषें हें घडलें ।।३५।। मज सुळावरीं तूं चढविलें । हें न जाणता घडलें । तें मी पाहिजे सहन केलें । कर्मभोग हा ओढवला ।।३६।। नंतर नृप तेथ आणवित । लोहार जे कार्यकुशल असत । त्यांनी प्रयत्न केले बहुत । परी शूळ निघेना ।।३७।। खिळा जो रुतला हातांत । बाहेर उपटण्या अशक्य होत । म्हणोनी भयाकुल संत्रस्त । शूलाग्र तोडिती लोहार ।।३८।। परी जेवढा मुनि हस्तात । रुतला तेवढा तैसाच राहत । राजा मुनीची पूजा करित । परी मुनी न वाचला ।।३९।। प्राण त्यजून मांडव्य जात । यमलोकीं तो संतप्त । कोपरक्ताक्ष विचारित । यमास श्रेष्ठ जो नियामकांत ।।४०।। मी काय ऐसें कर्म केलें । पापरूप जें मज बाधलें । ज्यायोगें सुळावरी चढविलें । महाशठा सांग मज ।।४१।। ऐसें घोर दुःख मज प्राप्त । कां झालें तें सांग त्वरित । मांडव्याचें क्रोधयुक्त । वचन ऐकून यम भ्याला ।।४२।। हातांची ओंजळ जोडून । विनीतभावें बोले वचन । कर्म कोणतें घडलें हातून । मुनिवरा तुझ्या ऐक

आतां ।।४३।। बालपणी तू एका कीटास । काट्यानें वेधिलेस । त्याचें हे कर्मफळ पावलास । शूलाग्रीं स्वयं बैसोनियां ।।४४।। ते ऐकतां संतापयुक्त । यमासी मांडव्य म्हणत । धर्मराजा जें बाळबुद्धीनें घडत । तें कर्म कैसे बंधनकर ।।४५।। महामूर्खा जें अज्ञानें झालें । त्या पापाचें फळ कां दिलें । म्हणोनी तुलाही पाहिजे अवतरलें । धरातलीं नीतिविहीना ।।४६।। शूद्र योनींत वर्षे शत । तूं जगशील मृत्युलोकांत । कर्मफळ भोगून यमलोकांत । पुनरपि तूं तैं येशील ।।४७।। सांप्रत मी भानुजा नियम करित । ती मर्यादा पाळ सतत । आठ वर्षेपर्यंत । घडे तें कर्म निष्फळ धरी ।।४८।। माझ्या वचनावरून । गणराज प्रसादें नियमन । आठ वर्षांहून जीं लहान । त्या बालकांचें कर्म निष्फळ ।।४९।। यमास ऐसें आज्ञापित । नंतर मांडव्य स्वाश्रमीं परतत । एकाक्षर विधानें तोषवित । विघ्नपासी तो महामुनी ।।५०।। कवचाच्या प्रसादें होत । शूलाग्र जें रुपलें हातात । मांसरूप तें करांत । सामावून गेलें दुःख शमलें ।।५१।। आणि मांडव्यक नामें ज्ञात । तेव्हांपासून तो मुनी जगांत । स्वल्पकाळें योगीश होत । गाणपत्यप्रिय मांडव्य ।।५२।। नित्य गणपतीची मूर्ति पूजित । सदा गणेश भावज्ञ असत । सर्ववंद्य महायशवंत । ऐसे हें मांडव्य आख्यान ।।५३।। मांडव्याचें हें चरित । पुण्यकारक जो नर ऐकत । अथवा पठन करी श्रद्धायुक्त । विघ्नेश प्रसन्न सदा त्यासी ।।५४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मांडव्यचरितं नाम चत्वारिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । मुद्गल कथा पुढती सांगत । पांडूसी ब्राह्मण राजा

करित । धृतराष्ट्र जन्मांध असत । म्हणोनि त्यासी न राज्यपद ।।१।। पांडू सिंहासनीं बैसत । समस्त वसुंधरा जिंकित । तेव्हां राजछत्रादी चिन्हें देत । ज्येष्ठ भ्रात्यासी भक्तीनें ।।२।। परपुरंजय पांडू करी सन्मान । धृतराष्ट्राचा तैं महान । त्या धृतराष्ट्राची भार्या पावन । गांधारी नामें पतिव्रता ।।३।। पांडूच्या दोन कांता । कुंती माद्री नामें ख्याता । एकदा वनांत मृगयेकरितां । त्या दोघींसह तो गेला ।।४।। तेथ त्यांच्यासह रममाण । करी आनंदे क्रीडन । मृगरूपधर मुनींचा घेतला प्राण । तेव्हां त्यानें अजाणता ।।५।। तो मृग होता कामासक्त । आपुल्या मृगीशी संग करित । मरणोन्मुख तो शाप देत । तया पांडू नृपासी ।।६।। भार्येच्या मी संगांत । असतां मारिलेंस तूं अवचित । म्हणोनि नराधमा जगतांत । मैथुनसुख तुज न मिळेल ।।७।। जरी होशील मैथुनासक्त । त्या समयीं मरशील त्वरित । हा माझा शाप निश्चित । ऐसें बोलून प्राण सोडी ।।८।। त्या द्विजसत्तमाचा घोर शाप ऐकत । पांडू तेव्हां दुःखी होत । राज्य सोडून जात वनांत । महाघोर जें श्वापदमय ।।९।। तेथे दोन्ही भार्यांसहित । मन:संयमन करून राहत । कंदमूळादी भक्षित । विषयोपभोग त्यानें सोडिले ।।१०।। नंतर मंत्रसामर्थ्यें जन्मत । यमधर्मापासून कुंती सुत । युधिष्ठिर नामें प्रख्यात । महाभाग सत्यव्रत ।।११।। वायूपासून भीमसेन जन्मत । पराक्रमी जो बलवंत । इन्द्रापासून अर्जुन समुद्भुत । धनुर्विद्यापरायण जो ।।१२।। माद्रीपासून जन्म पावत । अश्विनमंत्रें रूपलावण्ययुत । नकुल सहदेव वीर्यवंत । ऐसे पांच सुत पांडूचे ।।१३।। गांधारी शतपुत्रांस जन्म देत । अमितओज ते शक्तियुक्त । एक पुत्रिका तिज होत । लावण्यसंयुत प्रजापते ।।१४।। पांडू शापप्रभावें माद्रीसहित । विषयसुखाचा आस्वाद घेत । तैं शापप्रभावें मृत्यु पावत । सहगमन केलें माद्रीनें ।।१५।। कुंतीनें करण्या पुत्रांचे

पालन । नाही केलें सहगमन । ब्राह्मणांसहित करी गमन । हस्तिनापुराप्रती तदा ।।१६।। भीष्मादि तिचा संमान करिती । परी कौरव पांडवांचा द्वेष करिती । विषप्रयोगादि आचरती । पांडवांस नष्ट करण्यासी ।।१७।। परी पांडव सुरक्षित । राहिले दैवयोगें हस्तिनापुरांत । म्हणोनि लाक्षागृहांत । त्यांसी कौरव घेऊन जाती ।।१८।। लाक्षागृहासी आग लाविती । पांडव दहन करण्या वांच्छिती । परी अनुकूल कर्मगती । म्हणोनि पांडव वाचले ।।१९।। मातेसह पांडव सुरक्षित । दुर्योधन पीडा करी द्वेषयुक्त । तेव्हां भीष्म कौरवांसी सांगत । अर्धे राज्य द्या पांडवांसी ।।२०।। धृतराष्ट्र तें वचन ऐकत । पांडवांसी अर्धराज्य देत । तेव्हा ते इंद्रप्रस्थीं जात । धृतराष्ट्राच्या आज्ञेनें ।।२१।। तेथ दिग्विजय करित । पांडव श्रीसंपन्न होत । महाभाग कृष्ण असत । पक्षग्राही तयांचा ।।२२।। राजसूय यज्ञ करून । पांडव झाले शोभायमान । दुर्योधन रागानें पाहून । दुःखित झाला मानसीं ।।२३।। तो धृतराष्ट्रास सांगत । बोलवा द्यूत खेळण्या पांडवास राज्यांत । दुर्बुद्धी तो सांगे सुत । धृतराष्ट्रे तें मानिलें ।।२४।। पांडवांसी जिंकी द्यूतांत । दुर्योधन झाला अतिहर्षित । साहसप्रिय पांडव जात । वनवासांत द्यूतजित ।।२५।। बारा वर्षे वनवासांत । एक वर्ष रहावें अज्ञात । ऐसें द्यूत हरता पांडवाप्रत । दुरवस्था ही ओढवली ।।२६।। राज्यादिक सारें सोडून । पांडव करिती वनांत गमन । तेथ श्रीकृष्ण करी आगमन । बलभद्रासह त्या समयीं ।।२७।। पांडवांचें सांत्वन करित । म्हणे तयांसी क्रोधयुक्त । दुर्योधना महादुष्टा मारीन निश्चित । युधिष्ठिरा मी निःसंशय ।।२८।। नंतर राज्य तुम्हांस देईन । आनंदे नंतर शत्रुविहीन । घालवा तुम्हीं जीवन । युधिष्ठिर तेव्हां त्यास म्हणे ।।२९।। जनार्दना राज्य करीन । धर्मयुक्त मीं सत्यवचन । अधर्मयुक्त राज्यदान । पापद मजला करूं नको ।।३०।। माझी प्रार्थना

ऐकून । कोप न धरावा तूं उन्मन । धर्मसंयुक्त उपाय सांगून । आमुचें सांत्वन करावें ।।३१।। राज्यलाभद उपाय असत । जरी धर्मसंमत तुज ज्ञात । तरी तो सांगा आम्हांप्रत । युधिष्ठिर ऐसें प्रार्थितसे ।।३२।। तें ऐकून कृष्ण सांगत । युधिष्ठिरासी जो भ्रातृसहित । द्रौपदीच्या संगतींत । धर्मसंमत उपाय जो ।।३३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते युधिष्ठिरकृष्णसमागमो नामैकचत्वारिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । मुद्गल म्हणती दक्षाप्रत । ऐक विघ्नपाचें अद्भुत चरित । कृष्ण पांडवांसी जें सांगत । अमित द्युति वासुदेव ।।१।। श्रीकृष्ण म्हणे युधिष्ठिराप्रत । महापुण्यशीला ऐक वृत्तान्त । उपाय असे एक अद्भुत । संकट मुक्त होण्यास्तव ।।२।। पुरातन इतिहास सांगेन । जो आहे अपूर्व महान । सर्व विघ्नहर पुण्यपावन । महोदर गुणांनी लक्ष्मीमंडित ।।३।। एकदा देवदेवेश वैकुंठांत । विष्णु बैसला होता लक्ष्मीसहित । विश्वक्सेनादी समीप असत । सुखविलासीं निमग्न ।।४।। गरुड वाहन पुढ्यांत । त्याच्या होते हर्षयुक्त । अप्सरा गंधर्व देव सेवित । विष्णु देवास त्या समयीं ।।५।। सर्व देवांच्या सान्निध्यांत । लक्ष्मी म्हणे भगवंताप्रत । सनातना महाभागाप्रत । विनयसंयुत त्या वेळीं ।।६।। स्वामी ऐका माझी विज्ञप्ती । आपण माझी सतत गति । स्त्रियांस भर्त्यांसम जगतीं । नसे अन्य हें वेदभाषित ।।७।। आपण साक्षात् देवदेवेश । शंकरादी स्तविती विशेष । भक्तांसी सिद्धिदाते सिद्धीश । षडैश्वर्य समायुक्त ।।८।। देवादींस पदप्राप्ति होत । आपणापासून सुविहित । सर्वांस भुक्तिदाते जगात । मुक्तिदाते आपणची ।।९।। सर्वांचे पालक

आपण विश्वांत । आपुला पालक अन्य नसत । तथापि ध्यान करता सतत। कोणास भजता तें सांगा ।।१०।। एकान्तात पूजिता कोणास । आपण आनंद परमब्रह्म जगास । श्रुति सांगती रहस्य । म्हणोनी विस्मय मम चित्तीं ।।११।। म्हणोनी मी निर्लज्ज विचारित । कोणाचें ध्यान करिता सतत । मी आपुली चरणादासी विनीत । संशय माझा दूर करा ।।१२।। आपण सर्वत्र द्वंद्वहीन । समरूप आनंदमय महान । तरी कां मोहविता जन । ध्यान करूनी अन्याचें ।।१३।। या पूजन ध्यानाचें आपणांस । काय फळ मिळणार विशेष । तथापि करिता भक्तीस । कोणाची आपण केशवा? ।।१४।। श्रीकृष्ण म्हणती युधिष्ठिराप्रत । प्रियेचें हे वचन ऐकून हसत । तिला आलिंगन देऊन म्हणत । ऐक प्रिये जलधिसुते ।।१५।। तूं शुभप्रद प्रश्न विचारलास । जो तारक सर्व भूतांस। सिद्धिदाता सकलांस । उत्तर त्याचें ऐक आतां ।।१६।। जनासी मोहविण्या न करित । ध्यान मी नित्य चित्तांत । कुलदेवास गणेशा भजत। सर्वभावें मी प्रियें ।।१७।। गुणेश्वरापासून संजात । महेश्वर आम्हीं जगीं ख्यात । पांच देव महाभागे बलयुक्त । ऐक पूर्व परंपरा ।।१८।। गुणेशें पूर्वी आराधिला । गणनायक जो वंद्य जगाला । त्या गणेशें तेव्हां स्थापिला । स्वपदीं प्रेमभावयुत ।।१९।। त्याच्या वरदानें होत । गुणेश ज्ञान सत्तादि संयुक्त । तो गुणेशही भक्तिसंयुत । भजू लागला त्या गणेशासी ।।२०।। त्याची सेवा करून । आम्ही झालों ज्ञानवान । स्वकार्य प्रवर्तक पावन । महेशान प्रख्यात ।।२१।। म्हणूनी भावसंयुक्त भजत । आम्हीं तयास आदरयुक्त । तो आमुचा कुलदेव प्रख्यात । सर्व अर्थप्रदायक ।।२२।। विष्णूचें वचन ऐकून । लक्ष्मी झाली विस्मित मन । महाविष्णूस बोले वचन । विनयपूर्वक तदनंतर ।।२३।। कोण हा गणेश्वर देव । कैसें स्वरूप कोण ठाव । तो जर आपुला कुलदेव ।

जनार्दना मी भजीन त्यासी ।।२४।। देवि तू योग्य प्रश्न केलास । आता करीन वर्णनास । त्याचें स्वरूप अपूर्व सुरस । सांगेन मी तुज स्नेहानें ।।२५।। स्वानंदीं तो गणेश राहत । ब्रह्मनायक पंचधा जन्मत । त्याचें कथानक तुजप्रत । वर्णन करतो या वेळीं ।।२६।। नामरूपात्मक देव जगतीं । ब्रह्मांत त्याची नित्य स्थिती । तेथ स्वानंदक योग वर्णिती । असद्रूप या नावानें ।।२७।। असत्‌तत्त्वांत अमृतरूप असत । ते सदात्म प्रवाचक ख्यात । सत्स्वरूप स्वानंदयुक्त । ऐसे जाण प्रिये तूं ।।२८।। जें सत्यासत्य विहीन । सत्यासत्यमय नित्य नूतन । आनंदात्मक रूपी तो महान । समस्वानंद जाणावा ।।२९।। त्रिप्रबोध त्रिभिर्हीन । नेतिरूप मोहहीन । महाभागे तो महान । स्वानंद अव्यक्त प्रसिद्ध ।।३०।। वेदवादी गणेशाचे वर्णन । मायामय ऐसें करिती पावन । चतुर्धा रचना करून । तो त्यांत नित्य खेळे ।।३१।। मायाहीनतेनें होत । ढुंढी प्रयोगवाचक अद्भुत । त्याचा कोणाशी संयोग न होत । ऐसे बुधजन सांगती ।।३२।। जें मायायुक्त विहीन । तेच भ्रांतिदायक असून । त्या उभयतांच्याहून भिन्न । गणेश हा योगरूप ।।३३।। त्यात योगिजनांस शांति लाभत । यांत कांही संशय नसत । म्हणोनी योगस्वरूपा ती ज्ञात । शांति उत्तम जाणावी ।।३४।। मनवाणीमय सर्व असत । गकाराक्षरानें व्यक्त । मनवाणी विहीन ज्ञात । णकाराक्षररूपानें ।।३५।। त्यांचा जो स्वामी प्रख्यात । तो हा गणाधीश वेदांत । यासाठीं भक्तिसंयुक्त । भजतों मी त्या सर्वनायका ।।३६।। भ्रमरूपा ती महामाया । मानदे सिद्धि जाणी सदया । सिद्धीस्तव सर्व लोक या । भ्रमण करिती जगतांत ।।३७।। भ्रमधारकरूपा बुद्धि जाण । सिद्धि बुद्धि भ्रमाची खूण । त्यांचा स्वामी सिद्धिरमण । सदा योगशांतिरूप ।।३८।। या कारणें जे ब्रह्मभूत । ते होती त्याच्या भजनीं रत । ऐसें

सांगून नारायण थांबत । समुद्रपुत्री चकित झाली ।।३९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते लक्ष्मीनारायणसंवादवर्णनं नाम द्विचत्वारिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय बेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । श्रीकृष्ण कथा पुढे सांगती । युधिष्ठिरासी अति प्रीती । महाभागा धर्मा ऐक सुमती । पापहारिणी ही कथा ।।१।। लक्ष्मी नारायणासी विचारित । गणेशज्ञानलालस चित्त । महाशांतिप्रद पुनीत । कथिलें आपण रहस्य ।।२।। तथापि मजला सुशांति लाभावी । मनाची साम्यता व्हावी । ह्यास्तव युक्ति सांगावी । शांति उपायज्ञ आपण ।।३।। तेव्हां नारायण म्हणत । षडक्षर मंत्रानें जो पूजित । त्यासी गणनाथ प्रसन्न होत । शांतियोग साध्य तदा ।।४।। त्याचें दर्शन ज्यास होत । त्यास शांति लाभे त्वरित । त्याची तूं आराधना करी सतत । योगयुक्त मनानें ।।५।। ऐसें सांगून तिजला देत । महाविष्णु तो मंत्र पुनीत । षडक्षर गणेशप्रिय विधियुक्त । महालक्ष्मीस त्या समयीं ।।६।। नंतर ती त्यास नमून । वनांत गेली तपार्थ तत्क्षण । हिमाचलशिखरीं बसून । उत्तम तप आरंभिलें ।।७।। षडक्षर विधानें गजानन । ध्यायिला अंतरीं पावन । मंत्रराजाचा जप प्रसन्न । नासाग्र नयन लावून करी ।।८।। चित्ताची तैशी इंद्रियांची वृत्ति । गजाननीं स्थिर करि ती । निराहार राहून तप भक्ति । लक्ष्मी देवी करीतसे ।।९।। ऐसीं शतवर्षें जात । लक्ष्मी अस्थिचर्म मात्र राहत । तेव्हां गणेश भक्तिबद्ध येत । तिजसन्निध त्या समयीं ।।१०।। गणाधीश जेव्हां प्रकटत । महादेवी तैं त्यास नमित । चतुर्भुज महोदर त्रिनेत्रयुक्त । परशु आदी हातीं त्याच्या ।।११।। प्रभू

तो मूषकध्वज । मूषकावरी बैसला असत । सिद्धिबुद्धिसमायुक्त । नाना भूषणांनी पूर्ण ।।१२।। चिंतामणि त्याच्या गळ्यांत । ज्योतिष्मंतपती तो विलसत । शेष रुळे नाभिवरती विनत । गजास्य शोभे रक्तवस्त्रधर ।।१३।। त्या प्रभूस नाना उपचारें पूजित । पुन्हां पुन्हां त्यास नमत । करसंपुट जोडून स्तवित । श्रीमहालक्ष्मी त्या वेळी ।।१४।। महोदरा नानालीलाधरा । स्वानंदसंस्थाधारा बाहुधरा । भक्तिगम्या मूषकारूढा उदारा । चतुश्चालका तुज नमन ।।१५।। मूषकध्वजा अनन्त आनना । अनन्त देहा गजानना । अनन्त विभवा सदा प्रसन्ना । अनन्त हस्तपादा तुज नमन ।।१६।। चराचरमयासी । चराचरविवर्जितासी । योगशांति प्रदात्यासी । योगस्वरूपासी नमन ।।१७।। अनादीसी गणेशासी । आदिमध्यांतस्वरूपासी । आदिमध्यांत हीनासी । विघ्नेशासी नमो नमः ।।१८।। सर्वादिपूज्यासी सर्वपूज्यासी । सर्वांच्या कारणासी । ज्येष्ठराजासी विनायकासी । सर्वनायका तुज नमन ।।१९।। ढुंढिराजाशी हेरंबासी । भक्तेशासी सृष्टिकर्त्यासी । सृष्टिहर्त्यासी पालकासी । गणेशासी नमो नमः ।।२०।। देवेशासी त्रिहीनासी । कर्मांचे फलदात्यासी । कर्मचालकासी लंबोदरासी । कर्माकर्महीना नमन असो ।।२१।। योगेशासी योग्यांसी । योगदात्यासी गजाननासी । ब्रह्मभूतासी सदा शांतिधनासी । पुनः पुनः नमन असो ।।२२।। गणनाथा कैसी करूं स्तुति । तूं सदा प्रभू ब्रह्मपति । म्हणोनि तुज प्रणाम करी भावभक्ति । त्यानें तुष्ट तूं होई ।।२३।। धन्य मी कृतकृत्य जगांत । सफळ माझा जन्म होत । धन्य माझा जनक नाथ । ज्या मीं पाहिला गजानन ।।२४।। ऐसी स्तुति भक्तियुत । लक्ष्मी करी आनंदाश्रुयुक्त । परमानंदें ती नाचत । कंठ गद्गद जाहला ।।२५।। गणाधीश तिज म्हणत । वर माग जो मनोवांच्छित । महालक्ष्मी मीं देईन तुजप्रत । भक्तिभावें संतुष्ट

।।२६।। तूं जें हें स्तोत्र रचिलें । तें मज प्रिय जाहलें । वाचकां पाठकां वरदान दिलें । भुक्तिमुक्ति लाभाचें ।।२७।। पुत्रपौत्रादिक सर्व लाभेल। जो हें भक्तिभावें वाचील । धनधान्यादि सुख मिळेल । तया श्रद्धावंतासी ।।२८।। गणेशाचें ऐकून वचन । महालक्ष्मी म्हणे तयासी प्रसन्न । हात जोडून विनीत मन । महोदरा जरी कृपा तुझी ।।२९।। तरी तुझी दृढ भक्ती । नाथा देई मजप्रती । तूं कुलदेव आमुचा निश्चिती । भावयुक्त तुज भजतें ।।३०।। माझें मन चंचल । पुत्रमोहानें व्याकुळ । तरी पुत्र होऊन माझा प्रबळ । विघ्न दूर करी माझें ।।३१।। पुत्रवात्सल्यें तुज भजेन । तुझें लालनपालन करीन । गजवक्त्रादि युक्ताचें पूजन । सांप्रत देवभावे करीतें मी ।।३२।। तो तूंच पुत्ररूपें संसारांत । जरी प्रत्यक्ष प्रकट होत । योगरूप तूं साक्षात । तरी मज योगशांति लाभेल ।।३३।। तुझी मातापितरें बंधयुक्त । राहतां वेदवचन मिथ्या ठरत । म्हणोनी तूं देशील त्वरित । योगशांति आम्हांसी ।।३४।। तरी आतां होई माझा सुत । गणनायका तूं साह्यभूत । माझा भक्तिभाव जाणून पुनीत । हाच वर मज द्यावा ।।३५।। करुणानिधे अन्य न वांच्छित । दुसरा कांही वर मनांत । देवदेवेशा तुज प्रार्थित । ऐसें लक्ष्मी विनवीतसे ।।३६।। तें ऐकून लक्ष्मीचें वचन । शुभभावज्ञ गणेश बोले प्रसन्न । ज्ञानाच्या शत्रूचें करीन नाशन । तुझा पुत्र होऊनि मी ।।३७।। तूं जें जें वांच्छिसी मनांत । तें तें तुज प्राप्त होईल निश्चित । माझ्या वरदानें जगतांत । योगिवंद्य तूं होशील ।।३८।। तू केलेंस माझें भजन । म्हणोनि तू मोहहीन । योगस्था शांतियुता होऊन । भृगुपुत्री झालीस ।।३९।। नंतर द्विजशापें मोहसंयुत । समुद्र तुजसी आराधित । म्हणोनी सागरसुता तूं होत । विष्णूची प्रिय दयिता ।।४०।। तदनंतर तुज माझी विस्मृती । झाली निःसंशय चित्तीं । विष्णू करी बोध तुजप्रती । योगसेवा केलिस तैं

।।४१।। म्हणोनि मजप्रत आलीस । आतां सर्व आण स्मरणास । अनघे आदिकाळीं सोल्हास । विष्णूनें मज प्रार्थिलें ।।४२।। पुत्रार्थ तो याचना करित । त्या समयीं जैसा भावयुत । तैसीच तूं समुद्रसुते वांच्छित । पुत्रत्वें मज या समयीं ।।४३।। तरी विष्णूसहित तुझें हित । करीन मी निश्चित । ऐसें बोलून गणेश जात । स्वानंदकपुरीं परतून ।।४४।। गणेशात्मा अन्तर्धान पावत । लक्ष्मी तैं खिन्न होत । योगबळें पुरातन कथा स्मरत । विस्मित झाली मानसीं ।।४५।। द्विरदानना ती स्मरत । मूर्ती त्याची तेथ स्थापित । वेदपारग ब्राह्मण म्हणत । वेदमंत्र ज्या वेळीं ।।४६।। त्या मूर्तीची पूजा करुन । लक्ष्मी स्वस्थानीं जाय परतून । महाविष्णूस करून वंदन । सांगे सर्व वृत्तान्त तयासी ।।४७।। तो ऐकून अति हर्षित । महाविष्णू लक्ष्मीस म्हणत । जलधिसुते तूं धन्य जगांत । गजानन प्रत्यक्ष पाहिलास ।।४८।। आता तो विभू प्रसन्न । सत्य करील वरदान । पुत्रभावें जन्म घेऊन । विघ्नप आपणा तोषवील ।।४९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते महालक्ष्मीवरप्रदानवर्णनं नाम त्रिचत्वारिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय त्रेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । युधिष्ठिर कृष्णास प्रार्थित । तुझ्या मुखकमलातून नि:सृत । जी कथा पुण्यवान अद्भुत । अमृतपानासम ती वाटे ।।१।। ऐकून माझें मन न धालें । तरी पुढती पाहिजे कथन केलें । ज्ञानारी नाम ज्यास लाभलें । कोण तो दैत्य सुत कोणाचा ।।२।। त्याचें कोणतें कर्म असत । तें सर्व कृष्णा सांग मजप्रत । ज्या कारणे गणराज होत । देहधारी या जगीं ।।३।। त्याचें चरित्र न सामान्य । गणेश विष्णूचा

सुत असामान्य । ब्रह्मनायक अवतार मान्य । घेऊन काय करिता झाला ।।४।। मुद्गल दक्षास सांगती । युधिष्ठिराची ऐकून उक्ती । वृष्णि कुलोद्भव नारायण सांगती । भवनाशिनी पूर्वकथा ।।५।। युधिष्ठिरा रमणीय पावन । कथा ऐक जी रम्य प्रसन्न । ब्रह्मभूयप्रद चरित महान । ढुंढि देवाचें असामान्य ।।६।। दुर्बुद्धि नाम दैत्येशा मारित । विघ्नहर शिवपुत्र रूपांत । त्रैलोक्यीं विजय पावत । त्या दुर्बुद्धीचा सुत ज्ञानारी ।।७।। बाल्यापासून तो ख्यात । ज्ञानारी नामें जगांत । प्रल्हाद आपुली सुता देत । हर्षसमन्वित तयासी ।।८।। रूपलावण्यसंयुक्त । प्रल्हादाची पुत्री ख्यात । सुकला नामा ती स्त्री भजत । ज्ञानारीस मनोभावें ।।९।। परी यौवनयुत तो स्मरत । सदैव दुर्मति पित्यास मनांत । गणेशाच्या हस्तें मृत । जाहला होता जो पूर्वी ।।१०।। ज्ञानारि शुक्राचार्यास शरण जात । विद्या पंचाक्षरी अभ्यासित । वनांत जाऊन आराधित । शंकरासी भक्तीनें ।।११।। वायुभक्षण करून राहत । महादैत्य तो तपश्चर्यारत । उग्र तप आचरित । अयुतवर्षें श्रद्धाभावें ।।१२।। तदनंतर शंभू पार्वतीसहित । त्याच्यासमोर उपस्थित । त्या महाभक्तासी म्हणत । भक्तवांच्छा पूरक जो ।।१३।। महाभागा तपें तोषविलें मजप्रत । आतां सांग मनोगत । जें जें तुझें वांच्छित । तें तें दुर्लभही तुज देईन ।।१४।। शिवाचें वचन ऐकून । दैत्यपुंगव जागृत होऊन । शंभूस करी मोदें वन्दन । पूजा करी मनोभावें ।।१५।। तदनंतर स्थिरचित्तें स्तवित । भक्तवत्सला शंकरा विनत । पार्वतीसहिता शंकरा तुज नमित । वृषभध्वजा तुज वन्दन ।।१६।। शैलादिवाहनासी अव्यक्तदेवासी । शिवासी शूलधारकासी । निर्गुणासी गुणचालकासी । सदाशिवासी नमन माझें ।।१७।। मायेच्या आधारासी । मायामोहविहीनासी । शंभो वृष्टिकर्त्या तुजसी । नमन सृष्टिपालका ।।१८।। संहारकर्त्यासी

त्रिस्वरूपासी । अनाथासी सर्वनाथासी । परमात्म्यासी चराचर स्वरूपासी । चराचरात्म्यासी नमन ।।१९।। महादेवासी देवपतीसी । मनवाणी-अतीतरूपासी । योगिध्येयासी योगपतीसी । महेश्वरा तुज नमन ।।२०।। धन्य वंश माझा झाला । तव दर्शनाचा लाभ जाहला । तप ज्ञान पितरें मला । धन्य वाटती आज माझीं ।।२१।। जरीं तूं महादेवा प्रसन्न । तरी देई मज वरदान । चराचराचें राज्य लाभून । त्यापासून मला मरण नसे ।।२२।। जें मी इच्छीन । तें तें सिद्ध होवो कार्य महान । आरोग्यादिकें युक्त करून । अमर करी मज सदाशिवा ।।२३।। 'तथास्तु'"ऐसें बोलून । शिव पावला अन्तर्धान । तदनंतर ज्ञानारी हर्षित मन । गृहीं आपुल्या परतला ।।२४।। ज्ञानारीकृत हें स्तोत्र वाचित । अथवा जो हें ऐकत । त्यास वांच्छित सर्व देत । श्रीशंकर प्रसन्नचित्तें ।।२५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते ज्ञानारिवरप्राप्तिवर्णनं नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चव्वेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्ण कथा पुढें सांगती । ज्ञानारि जाहला प्रबळ जगतीं । दैत्य तयासी पूजिती । शुक्राचार्या बोलाविती ।।१।। त्यानें विप्रांसह येऊन । अभिषेक केला ज्ञानारीस प्रसन्न । पांच प्रधान बळवंत नेमून । राज्यकार्य सुरू केलें ।।२।। नमुचि शंबर कलासुर । प्रतापवंत जंभ बलासुर । हे ते पांच प्रधान उत्तर । दिग्विजयास निघाले ।।३।। नानाविध दैत्यगणांनी युक्त । ते जिंकिती पृथ्वी समस्त । सप्त सागरें वलयांकित । नंतर गेले पाताळीं ।।४।। पाताळ जिंकून स्वर्गांत । ज्ञानारी दैत्यांसह जात । तेव्हां इंद्र सुरगणांसहित । पळाला भयभीत

होऊन ।।५।। ज्ञानारी जिंकून स्वर्गलोक । जिंकण्या गेला सत्यलोक। तेव्हां देवांसह ब्रह्मा पळत साशंक । ज्ञानारी गेला वैकुंठीं ।।६।। वैकुंठ सोडून विष्णू पळाला । युधिष्ठिरा हाहाःकार माजला । दैत्यें वैकुंठ जिंकला । अत्यानंद दैत्यांसी ।।७।। नंतर असुर कैलासांत । दिग्विजयार्थ जात । दैत्यनायक शंकरा नमित । म्हणे कैलास दे मजला ।।८।। अन्यथा युद्ध करून जिंकीन । तुजसी मी बळवंत महान । यात संशय काहीच न । ऐकतां शंकर क्षोभला ।।९।। परी होऊन भयकंपित । कैलास तयास देत । होउनी तो भयभीत । देवांसहित वनीं गेला ।।१०।। कैलासात ज्ञानारी मोदांत । राहिला असुरवीरांसहित । नंतर दैत्येशां स्वर्गी स्थापित । निर्भय झाले सर्व असुर ।।११।। आपण स्वनगरीं परतत । दैत्यवीरांच्या सहित । सुकलेपासून ज्ञानारीस होत । महातेजस्वी एक सुत ।।१२।। युधिष्ठिरा सुमुहूर्ती जन्मला । तो रूपें अप्रतिम पुत्र भला । पुत्रजन्मानें आनंदला । असुरेंद्र देई विविध दानें ।।१३।। पुत्राचें जातकर्मादि करित । कर्मविनाशा दैत्यां पाठवित । ते सर्वत्र विनाश आचरित । भूमंडळी कर्मांचा ।।१४।। स्वाहा स्वधा वषट्कार । सर्वांचा लोप अनिवार । कर्महीनतेनें दुःख अपार । देवांस तेव्हां जाहलें ।।१५।। उपोषणपर ते विचार करिती । ज्ञानारीच्या नाशाची युक्ती । परी कांहीं न सुचे चित्तीं । ऐसा काळ बहु लोटला ।।१६।। तेव्हां काय करावें म्हणती । मनीं जाहलें विव्हल अती । विष्णू तयांसी म्हणती । हितकारक वचन तेव्हां ।।१७।। चराचरमय जें समस्त । त्यापासून ज्ञानारीस भय नसत । म्हणून विघ्नेश्वरा देवाप्रत । आतां शरण जाऊंया ।।१८।। तो बुद्धिपती साक्षात । बुद्धिनें छिद्र प्रकाशवील क्षणांत । त्यास भजून तें ज्ञात । करूंया आपण रहस्य ।।१९।। नंतर त्या ज्ञानारीस मारूं । आपण सिद्धिदात्यास स्मरूं । तेणें सर्व संकटें दूर करू । सुंदर उपदेश देवा

वाटे ।।२०।। दिवौकस ऐकून विष्णुवचन । करिती ढुंढीचें पूजन । दशाक्षर मंत्राचें ध्यान करून । गजाननासी तोषविती ।।२१।। नाना तपें ते आचरती । भक्तिभाव दाटला चित्तीं । ऐसें एक वर्ष करिती । उपासना गणेशाची ।।२२।। तेव्हां रात्री स्वप्नांत । येऊन लक्ष्मीच्या तो सांगत । हितकारक वचन उदात्त । ऐक माते सावधान ।।२३।। पूर्वी तूं सांगितलें मजप्रत । तुझा पुत्र मी व्हावें जगांत । तें वचन मी पूर्ण करित । पुत्रभावे प्रकटेन ।।२४।। ऐसें त्या भामिनीस सांगून । गणवल्लभ पावला अन्तर्धान । लक्ष्मीच्या मांडीवर बाळ होऊन । नंतर खेळू लागला ।।२५।। महालक्ष्मीस जाग येत । ती गणेशाचे बोल आठवित । तोंच आपुल्या शय्येवर पहात । शुंडाधर बाळ गणेश ।।२६।। विस्मित होऊन अत्यंत । नारायणासी सांगे वृत्तान्त । विघ्नपासी त्यास दाखवित । तेव्हां सर्व त्यास नमिती ।।२७।। स्त्रीसहित नारायण । भक्तिभावें करी वन्दन । प्रभूस त्या गाणपत्य सूक्तें म्हणून । माधव स्तवूं लागला ।।२८।। धन्य मी सर्व भावें जगांत । देवा तुझें अंघ्रियुगदर्शन होत । पुत्रभावें पावशील आम्हां सतत । यांत संशय मुळीं नसे ।।२९।। नंतर तेथ येत समस्त । अमर मुनी ऋषिजन त्वरित । त्या बालका पाहून विस्मित । स्तविती नाना स्तोत्रांनी ।।३०।। त्याचें जातकर्मादी करिती । अकराव्या दिवशीं नांव ठेविती । द्वंदभाव विहीन हा निश्चिती । म्हणोनी पूर्णानंद हें नांव ।।३१।। साक्षात आनंददायक । सर्व द्वंद्वांत विकारवर्जित एक । सर्वदा प्रमोददायक । हा होईल निःसंशय ।।३२।। त्यापरी पूर्णानंद नाम ख्यात । त्या महात्म्याचें जगांत । पांचव्या वर्षी व्रतबंध करित । अव्यय विष्णू तयाचा ।।३३।। कश्यपाच्या घरी जन्मत । दोन मुली विद्या अविद्या ख्यात । अदिती तप करून देत । त्या पूर्णानंद वरासी ।।३४।। तो पूर्णानंदास

भक्तिसंयुत । श्रद्धापूर्वक प्रणाम करित । गणनायक बारा वर्षांचा होत । तेव्हां बालक्रीडा करी ।।३५।। त्या क्रीडांनी मोहित । होती देवगण समस्त । स्तनपानादिक भोजनाच्छादनादी करित । लक्ष्मी स्वत: तयाचें ।।३६।। विष्णू देवगणांनी युक्त । नित्य त्याचे लाड करित । कश्यपही करी कौतुक बहुत । जावयाचें विप्रांसवें ।।३७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते पूर्णानंद अवतार वर्णनं नाम पंचचत्वारिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पंचेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । युधिष्ठिर म्हणे कृष्णा मजप्रती । सांग त्या दैत्याची कृती । पूर्णानंदहस्तें जगतीं । मरण त्यासी कैसें लाभे? ।।१।। हें सर्व कौतुक महान । सांगावें मजला समजावून । चराचरापासून अभय असून । ज्ञानारीस कैसा मृत्यु आला ।।२।। हें सर्व वाटे आश्चर्यभूत । म्हणोनि सांग सर्व चरित । मुद्गल सांगती दक्षाप्रत । कृष्ण काय म्हणती युधिष्ठिरासी ।।३।। ज्ञानारीचा पुत्र सर्वसंमत । सर्व जन त्यासी प्रशंसित । अकराव्या दिवशीं ते जात । आपापल्या गृहासी ।।४।। सुबोध ऐसें त्याचें नाम । दैत्येश ठेविती उत्तम । द्विज स्तुती करिती अनुपम । दानें तयां देती बहुत ।।५।। तो दैत्यसुत ज्ञानयुक्त । बाल्यातही विघ्नेशा चिंतित । स्तनपानादिकही न स्मरत । ध्यान करी सदा गणेशाचें ।।६।। ऐसे पांच तसे मास सात । जेव्हां पूर्ण होती त्या काळांत । त्याचे खेळ चालती अद्भुत । मित्रांसवें ते ऐक आता ।।७।। धुळींत स्वहस्तें काढित । गणेशाची आकृति पूजीत । पूजा उपचारार्थ घालित । धूलिकणची त्यावरती ।।८।। तें पाहून अति कुपित ।

ज्ञानारी म्हणे स्वपत्नीप्रत । माझ्या पित्याची हत्या घडत । ज्याच्या हस्तें पूर्व काळीं ।।९।। त्यासीच हा आपुला सुत पूजी । तेणें क्रोधोर्मी उसळे हृदयामाजी । सांप्रत शमवीन दुःखद जी । प्रिये ह्या पुत्रासी मारूनिया ।।१०।। तरी सावधान मन करून । परावृत्त करी ह्या कृत्यापासून । तरीच त्याचा वाचेल प्राण । अन्यथा घेईन प्राण त्याचा ।।११।। माझ्या पित्याच्या हत्याऱ्यास भजत । हा पुत्र जरी ये दृष्टिपथांत । पुनरपि तरी त्वरित । वधीन त्यास प्रिये मी ।।१२।। ती विनयसंयुत बोले वचन । ज्ञानारीची पत्नी नमून । मी बाळास परावृत्त करीन । ऐशा संकल्पापासून ।।१३।। ती महाभागा पतिव्रता । पतिवाक्याचा आदर करी तत्त्वता । म्हणोनि पतीच्या गमनकाळीं सुता । न पाठवी समोर तैं ।।१४।। पुत्राचे लाड करी ती सती । परी पतीची जैं अनुपस्थिती । सुबोध पुत्र ऐशा रीती। एक वर्षाचा जाहला ।।१५।। बोबड्या बोलें तों म्हणत । नमो हेलंबा विघ्नेशा सतत । गणेशा महोदला अविरत । लंबोदला विकटा नमन ।।१६।। ढुंढीस करी नमस्कार । ऐशा भावें मनोहर । गणपासी स्मरे तो उदार । अनन्यमनें धर्मपरायण ।।१७।। माता स्नेहवश होऊन । पतीच्या समीप कटाक्षें करून । पुत्रास त्या दूर ठेवून । सखीजन साहाय्यें वाचवी ।।१८।। यत्नपूर्वक ती रक्षित । पतीपासून आपला सुत । जरी पती तिज आज्ञापीत । समोर आणी पुत्र आपुला ।।१९।। तरी ती असत्य सांगत । म्हणे तो आहे निद्रित । ऐशापरी कालहरण करित । दुःखपूर्ण मनानें ।।२०।। ऐसी पांच वर्षे जात । तेव्हां ज्ञानारी अति हर्षित । व्रतबंध करी धर्मसंमत । सुबोधपुत्राचा प्रेमानें ।।२१।। परी सुबोध स्मरी गणेशास । चित्तीं भक्तियुक्त विशेष । कर्मभंगभयानें सोल्हास । मानसी पूजा करितसे ।।२२।। कर्मसमाप्तीनंतर नमन । सर्वांस करी सुबोध सुमन । नंतर गुरुकुलीं गमन । करी पित्याच्या आज्ञेनें ।।२३।। तेथ

नानारूपी दैत्यसुत । निवास करिती अद्भुत । शुक्रशिष्य जे महाभाग शिकत । आसुरी विद्या देवमोहिनी ।।२४।। शुक्र शिकवी राजपुत्राप्रत । आसुरी विद्या अविरत । परी विघ्नराजाचे स्मरण करित । भक्तिभावें तैं सुबोध ।।२५।। जेव्हां गुरु त्यास संमानिती । विद्या शिकविण्या ते उत्सुकमती । त्यांसी प्रणाम करून पुढती । उभा राहे कर जोडूनी ।।२६।। गुरु त्यास जे सांगत । तें ऐकून तो विस्मितचित्त । महाबुद्धि त्यास म्हणत । सुबोध विषयमग्नां तयासी ।।२७।। ब्राह्मण जे ब्रह्मनिष्ठ जगतीं । ते योगपरायण गणेशा भजती । गाणपत्या विशेषें पूजिती । भेदाभेदादी सोडून ।।२८।। मोहमयी आसुरी विद्या सोडून । गणेशार्थी घाला मन । आपण ज्ञानशील ब्राह्मण । तरीच वंद्य जगीं व्हाल ।।२९।। गणेशा सर्वपूज्यास सोडून । मोहप्रद अन्य भजावें म्हणून । कां मज सांगता पापवचन । विचार करा स्वमानसीं ।।३०।। स्वधर्मनिष्ठ जे ब्राह्मण असत । त्यांचे वचन ग्राह्य जगांत । तेथ संदेह अल्पही नसत । परी अन्यथा न ऐकावें ।।३१।। गुणहीन जरी ब्राह्मण जन । तरी ते वंदनीय हें वेदवचन । सर्वत्र त्यांचा होय संमान । म्हणोनि नमितो मीं तुम्हांसी ।।३२।। आपुलें वचन जरी हितयुक्त । तें मी स्वीकारीन त्वरित । परी अन्य उपदेश मोहसंयुत । कदापि मीं न मानीन ।।३३।। श्रीकृष्ण म्हणती युधिष्ठिराप्रत । सुबोधाचें वचन जैं ऐकत । तेव्हां तो ब्राह्मण गुरू विस्मित । दैत्यपुत्रा समजाविती ।।३४।। अरे दैत्यसुता सुखप्रद धर्म । ऐक बाळा सुबोधा कर्म । असुरजातीस जो अनुपम । तो आचार तूं पाळावा ।।३५।। तूं असुनी बालक लहान । योग सांगसी उत्तम । स्वधर्मादि विवेचन । करिसी योगीश्वरासम ।।३६।। तूं शिकला नाहींस वेदविद्या । महामते जी ज्ञानदा आद्या । तथापि हें ज्ञान असुराद्या । कैसें तुज प्राप्त झालें? ।।३७।। सुबोध म्हणे तयाप्रत । माता गर्भवती

एकदा जात । आपुल्या पित्याच्या सदनांत । मी होतों उदरीं गर्भरूपें तैं ।।३८।। तेथ महाभाग सर्वकोविद । शुकमुनी आले ज्ञानप्रद । त्यास नमून विनयविशद । प्रल्हाद पूजी हर्षभरें ।।३९।। त्या महात्म्यास पुजून । विनयान्वित तो बोले वचन । व्यासपुत्रा शुका महान । आपण साक्षात शिवशंकर ।।४०।। महायोगी आपण संदेहातीत । योगींद्राचे परम गुरू जगांत । पूर्वपुण्यें आज मज लाभत । दर्शन आपुलें सुदुर्लभ ।।४१।। म्हणोनि आपणास विचारित । करुणानिधे सांगा मजप्रत । सर्वमान्य योगशांतिप्रद असत । ऐसें तत्त्व अद्वितीय ।।४२।। नाना मतांचा विमोह छेदी । संशय सारा क्षणांत भेदी । ऐसा योग सांगावा बुद्धी । जेणें शांति लाभेल ।।४३।। प्रल्हादाचें ऐकून रम्य वचन । योगींद्रसत्तम शुकाचार्य बोले प्रसन्न । योगशांतिपरायण व्रत सुमन । हितकारक सर्वमान्य ।।४४।। प्रल्हादा तूं महाभागा जगांत । योग जाणण्या सुपात्र विनत । म्हणोनि हितकारक अद्भुत । सांगतों तुज विशेष तत्त्व ।।४५।। नाना मतांतरांत जें मान्यतम । सर्वांस शांतिप्रद जें अनुपम । ऐसें जें सेव्य परम । तें तुजला मी सांगतो ।।४६।। एकदा नैमिषारण्यांत । महर्षी सगळे उपस्थित । ब्रह्मांडमालांतले ज्ञानरत । ब्रह्मयज्ञ करण्या आले ।।४७।। जेथ योगमयी गाथा । दानवोत्तमा ती ब्रह्मयज्ञाची कथा । वेदान्तीं सांगितली ही प्रथा । थोर महर्षि तेथ आले ।।४८।। मरीची कश्यप आणि कण्व । पुलह क्रतु विश्वामित्र अभिनव । महातेजी याज्ञवल्क्य मुनि देव । आरुणीही तेथ होते ।।४९।। अष्टावक्र वसिष्ठ भरद्वाज । पराशर व्यास परशुराम महासतेज । श्वेतकेतु मुद्गल अगस्त्य सतेज । हनुमंत तैसा बिभीषण ।।५०।। अश्वत्थामा गृत्समद कृप । प्रतापी मार्कंडेय मृकंड गाणप । बकदाल्भ्य नारद कपिल अमाप । तप ज्यांचें ते उपस्थित ।।५१।। रैभ्य महायश कर्दम । एक द्वित त्रित देवल अनुपम ।

असित पुलस्त्य भृगु उत्तम । च्यवन गौतम तेथ जमले ।।५२।। अंगिरा दीर्घतमा उतथ्य गालव । दधीची ऊशना जीव अपूर्व । जमदग्नी महामुनि वैशंपायन सुदेव । शौनक शुनक वामदेव ।।५३।। समंतु पैल शाकलक मुनि । धौम्यकादि शिष्यसहित जैमिनी । अन्यही मुनिवर तेथे येउनी । ब्रह्मयज्ञीं भाग घेती ।।५४।। दत्तात्रेय दुर्वास निदाघ जडभरत । सनत्कुमार सनातन विख्यात । सनंदन अहं रिभू सनक येत । हर्षयुक्त त्या वेळीं ।।५५।। अवधूत योगी सर्व येत । यज्ञदर्शना उत्कंठित । इंद्र ब्रह्मा विष्णू विराजत । शंकर भानू सस्त्रीक ।।५६।। अन्य देवराज देवांसहित । शेष वासुकी कंबल बलवंत । अश्वतर तक्षकादि येत । महाभाग नागश्रेष्ठ ।।५७।। गंधर्व चारण सिद्धजन । साध्यगण आदित्य वसू प्रसन्न । यक्ष अप्सरागण उत्सुक मन । जमले तेथे यज्ञार्थ ।।५८।। कर्मनिष्ठ तपोनिष्ठ । योगी जे होते ज्ञाननिष्ठ । नाना देवरत मानश्रेष्ठ । सर्वही आले त्या स्थळीं ।।५९।। प्रल्हादा, ब्रह्मयज्ञ पाहण्यास । सर्व ते उत्सुक विशेष । निश्चयपूर्वक अति सुरस । जमलें सोत्कंठ अति प्रसन्न ।।६०।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते ब्रह्मयज्ञवर्णनं नाम षट्चत्वारिंशोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सेहेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । श्रीशुकाचार्य प्रल्हादासी सांगती । ब्रह्मयज्ञार्थ जे जमले असती । ते पंडित नानाविध कथा सांगती । मनोरंजक परस्परांसी ।।१।। नाना मतें ते मांडित । स्वबुद्धीनें विवरण करित । कोणी विधात्यास स्तवित । कोणी प्रशंसी विष्णूसी ।।२।। कोणी शक्तीस श्रेष्ठ म्हणत । कोणास रवि श्रेष्ठ वाटत । ब्रह्मरूप गणेश सर्वांत । श्रेष्ठ वाटे अन्यांसी ।।३।। कोणी अन्न कोणी प्राण । कोणी मनोविज्ञान । कोणी सोऽहं

आनंद ज्ञान । चैतन्य तैसा बिंदुक ।।४।। बोध आत्मा प्रशंसिती । कोणी सांख्य कोणी कर्म बाणिती । सम अव्यक्तरूप ते वर्णिती । परब्रह्म स्वसंवेद्य ।।५।। कोणी निवृत्ती शांतिरूपक । कोणी योगमध्यात्मस्वरूपक । असत्य सत्य पूर्णानंदक । वेदपरायण वर्णिती ।।६।। असुरा, सहज परब्रह्म रूप वर्णित । तेव्हां त्यांच्यात वाद होत । त्यांचा निश्चय न होत । मतमतांचा गलबला ।।७।। आपापल्या ज्ञानें युक्त । वाद करिती पंडित । तेव्हां वाद शांतीस्तव बोलत । विष्णु अव्यक्त सनातन ।।८।। शंकरप्रेरित विष्णू म्हणत । सर्व श्रोतृवृंदाप्रत । वेद गुरु स्वरूप निश्चित । समस्तांसी नि:संशय ।।९।। त्यांनी जें असेल संपादित । तें सर्व देव मुनींस प्रशंसित । तेंच आचरावें नेमें व्रत । निश्चयें सुख लाभण्यास ।।१०।। तेंच सर्वमान्य होईल । वेदांनी जें कथिलें अमल । स्वानुभव गाऊन सरल । यथातथ्य मुनीश्वरांनो ।।११।। म्हणून वेदांमुळें सर्वांस प्राप्त । ज्ञान परम होत जगांत । योगादि साहाय्यानें करित । साक्षात्कार ब्रह्माचा ।।१२।। कांहीं मुनी देव राक्षस आचरित । ऐसी योगादी साधनें जगांत । तथापि वेदसमान नसत । अधिकारी त्यांचें वचन ।।१३।। वेदांसम कोणी न दिसत । योगेश विप्रांनो जगांत । म्हणून संपूर्ण योगी वेद स्तुत । गुरुरूपें सर्वांचें ।।१४।। आपण महाभागांनो करा स्मरण । तेणें होईल संशयहरण । तें ऐकून योगी देव मुनिगण । योग्य अतियोग्य ऐसें स्तविती ।।१५।। बुद्धिमंता विष्णो तूं सांगितलें । तें आम्हां शोभन वाटलें । ऐसे बोलून शंकरप्रमुखांनी स्तविलें । सांग वेद त्या वेळीं ।।१६।। ते सर्वांगसहित ओंकारयुक्त । वेद त्यांच्या पुढें प्रकटत । त्यांस पाहून त्वरित उठत । देव ऋषिगणांसह ।।१७।। प्रणाम करून करिती पूजन । स्तविती उभय कर जोडून । आसनावरी विराजमान । ॐकारासह वेदमुख्य ।।१८।। त्या शिवमुख्य देवांस

विचारित । आम्हांस कां स्मरिलें चित्तांत । देव मुनींनों लोकांनो विनीत । काय कार्य तें सांगावें ।।१९।। तें निःसंशय पूर्ण करून । आम्ही करूं समाधान । ऐसें ऐकतां वेदवचन । शिव शंकर त्यांस म्हणती ।।२०।। विनयपुर्वक तैं म्हणत । विशेषज्ञ त्या वेदांप्रत । आमुचें कार्य सांगा निश्चित। करूं तें आम्हीं निःसंशय ।।२१।। सर्वांचे हित चिंतून । ब्रह्मयज्ञ आरंभिला आम्हीं महान । तेथ वाद प्रारंभ होऊन । तत्त्वरहस्य अन्त न लागे ।।२२।। म्हणोनी वेदांनो तुमची स्मृती । केली आम्हीं भावबळें सांप्रती । तुम्हीं विश्वगुरू निश्चिती । भेदनाशक तत्त्व सांगा ।।२३।। आपणासम योगी जगांत । अन्य कोणीही नसत । आपुलें वचन प्रमाण असत । योगज्ञ आम्हीं तेणें होऊं ।।२४।। शिवाचें वचन ऐकती । तेव्हां वेद तयांस म्हणती । देवांसी मुनींसी जनांसी प्रीती । दीनपालका असुरेश्वरा ।।२५।। अक्षरात्मक देह आमुचा । अधिकार न ब्रह्मयज्ञाचा पार करण्याचा । तथापि यथामति तयाचा । आशय आम्हीं सांगतो ।।२६।। आम्हीं ब्रह्मरूप नसत । किंचित् ब्रह्मज्ञ जगांत । योगमार्ग बळें सांगू यथार्थ हित । ऐका आपण सर्वांनी ।।२७।। प्रत्येक प्रश्नांचे उत्तर । सांगू आम्हीं ब्रह्मधारक उदार । जेणें संशय दूर । परम गतीस प्राप्त व्हाल ।।२८।। ब्रह्म नानाविध उक्त । योगबळें आम्ही सतत । प्रज्ञावादी महावाक्यांत । योगाचा विशेष सांगितलासे ।।२९।। सर्व ब्रह्म सुयोगाचें स्थान । योगात्मक तें महान । योगांत सर्व ब्रह्में असून । तदाकार ती वर्णिली असती ।।३०।। योगाहून ब्रह्म न परम । ते योगशांतीनें लाभे अनुपम । ब्रह्मणस्पति एक उत्तम । आम्ही गणेश्वर वर्णिला ।।३१।। सकल ब्रह्मांचा पालक । संरक्षक जो जगीं एक । त्यासी भजा सुरश्रेष्ठहो पावक । मुनींनो भक्तिपूर्वक तुम्हीं ।।३२।। त्याच्या भक्तीनें ब्रह्मभूत । सारे जन होती निश्चित । ऐसे बोलून बहुऋच

ऋग्वेद शांत । होऊन बसला त्या वेळीं ।।३३।। नंतर यजुर्वेद साक्षात । बोले त्या संसदेत । ब्रह्मप्रद वचन जें असत । स्वानुभवात्मक बळयुक्त ।।३४।। नानाविध ब्रह्म मी वर्णिलें । योगसेवेच्या प्रभावें आगळें । महावाक्यांच्या साहाय्यें केले । निरूपण तें क्रमार्थ ।।३५।। तेथ योगस्वरूपाख्य विशेष युक्त । आंत्य ब्रह्म सर्वज्ञ मानित । सर्व ब्रह्म सुयोगें होत । योग तो अपूर्व म्हणती ज्ञाते ।।३६।। तदर्थ गणराजासी प्रार्थिलें । भक्तांनी पूर्वी स्तविलें । योगप्राप्तीस्तव विनविलें । म्हणून साकार तो झाला ।।३७।। गण समूहरूप असत । समूह तें ब्रह्मरूप साक्षात । त्यांचा स्वामी गणेश वर्तत । त्यास भजावें विधिपूर्वक ।।३८।। यांत संदेह नसत । सकल अन्नांच्या समूहांत । सद्य एक अनेक रूप वसत । अन्नात्मक ब्रह्म जाण ।।३९।। ऐसें श्रुती सांगत । नानाविध ब्रह्में त्यांत उक्त । देवता ऋषींनो जगांत । गणरूप तीं जाणावीं ।।४०।। म्हणोनि भक्तीनें होत । सकलही सुलभ जगांत । ब्रह्मभूयप्रद ऐसें वर्णित । योगानें मीं योगपासी ।।४१।। ऐसे बोलून विराम घेत । यजुर्वेद योगवेत्ता उदात्त । तदनंतर सामवेद सांगत । निर्णयकारण ब्रह्माचें ।।४२।। योगसेवन मी केलें । म्हणून वर्णन करण्या बळ मिळालें । किंचित् ऐकावें देवेश भले । ब्राह्मणांनी मुनींनी ।।४३।। महावाक्यांच्या आधारें सांगत । नाना ब्रह्में मीं योगसेवारत । पात्रभेदार्थ अत्यंत । हें जाणावें श्रद्धेनें ।।४४।। त्यांत ब्रह्म शांतिप्रद । योगाख्य जाणा विशद । ब्रह्मासह साधे योग ते आनंद । योगक तेणें ते ज्ञात ।।४५।। योगाहून अन्य नसत। ते शांतिमार्गें लाभत । तेंच योगब्रह्म गणेशरूपें प्रख्यात । यात संशय कांहीं नसे ।।४६।। मनोवाणीमय देवांनो किर्तीत । तें तें गकाराक्षर संभूत । विबुधांनी जाणावें जगांत । मनोवाणीविहिन आतां ।।४७।। जें जें मनोवाणीविहिन । तें तें उद्भवें णकाराक्षरापासुन । त्यांचा स्वामी

गणेशान । योगाकार तो प्रकीर्तित ।।४८।। त्यासी भजावें विशेषें युत । ब्रह्मभूतप्रद जो विश्वांत । नानाभावांनी जें युक्त । त्यास देई तो योग ।।४९।। ऐसें बोलून सामवेद थांबत । तेंव्हा अथर्ववेद सकलांसी म्हणत । ब्रह्मयज्ञाचा तो जाणकर असत । त्याचें वचन ऐक आतां ।।५०।। आत्मा मी ऐशा वाक्यांत । नानाविध ब्रह्म मी सांगत । तें योगानें संपादित । तेंच उपाधिसंयुत ।।५१।। योगाख्य ब्रह्म परम । योगानें लाभते अनुपम । संयोग अयोग हीन । ऐसा हा योग ब्रह्माधिष्ठित ।।५२।। शांति त्या योगांत । लाभे ऐसे योगज्ञ सांगत । तोच गणनाथ विश्वांत । शांतिप्रद जाहला ।।५३।। एकला गणेशान असत । ईश जगांचा ब्रह्मांचा विश्वांत । समूहरूपांचा स्वामी ख्यात । योगरूप तो जाणिला ।।५४।। सर्वांचा आदिरूप योगाकार । नानाविध मध्यांत स्वअंशे उदार । अन्तीं स्वत:त लयकर । आदिपूज्य तो झाला ।।५५।। सर्वपूज्य तो देवेशांनो जाणावा । मुनींनो तोच पूजावा । जो आदि तोच अन्तीं बरवा । सर्वसंमत तुम्हांसी ।।५६।। मध्यांत मायाविहारें होत । भेद अभेदांनी युक्त । म्हणोनी त्या योगरूपाप्रत । योगसेवेनें भजावें ।।५७।। तरीच ब्रह्मभूत ब्रह्मयज्ञ पारग । तुम्ही व्हाल हो सुभग । ऐसें बोलून महायोगी पारग । अथर्ववेद विरमला ।।५८।। नंतर ओंकार सर्वयोगज्ञ सांगत । मी प्रकट चार वेदांत । योगसेवेंनें मज साक्षात । ब्रह्मदर्शन जाहले ।।५९।। त्यानें झालो योगमित । वेदांसी मीच उपदेश करित । ते प्रतिदिन साधना करित । योग ब्रह्मप्रद त्यांस लाभला ।।६०।। ते ब्रह्मज्ञ झाले सर्वसंमत । योगाहून अन्य ब्रह्म नसत । जग हें सुब्रह्म ख्यात । योगानें शाश्वत ब्रह्म लाभे ।।६१।। तें ब्रह्म हाच गणराज निश्चित । ऐसें योगी सांगत । संयोग अयोग भावें खेळत । योगरूपधारी तो ।।६२।। सिद्धि भ्रांतिमयी माया । बुद्धि भ्रांतिधरा जाया । त्यांचा स्वामी खेळवी तयां । विभू जो

सदा गजानन ।।६३।। भुक्ति सिद्धीनें लाभत । मुक्ति सिद्धि ब्रह्मपद देत । बुद्धि पंचविध असे चित्त । त्यांच्या योगें लाभेल ।।६४।। स्वसंवेद्यात्मक ब्रह्म । वेद ऐसें कथिती परम । सर्व संयोगरूप अनुपम । तेथ हा स्वयं दिसतसे ।।६५।। त्यानें स्वानंदवासी मायायुक्त । ऐसा हा प्रकीर्तित । त्याचें दर्शन अयोगांत । कदापिही न लाभे ।।६६।। निर्मायिक म्हणोनि ख्यात । सिद्धिबुद्धियोगें लाभत । गकार हा संयोग असत । 'ण'कार हा अयोग असे ।।६७।। त्या नावानें वेदवादी संबोधित । गणेशास जगांत । त्यास भजा विशेषयुत । ब्रह्मीभूताचे कारण जो ।।६८।। ऐसी उपासना त्याची कराल । तरी द्विजदेवांनो व्हाल । ब्रह्मभूत जगीं विमल । ॐकार थांबला बोलून इतकें ।।६९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते ब्रह्मयज्ञे वेदनिर्णयो नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सत्तेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । ॐकार वेद मुख्याचें वचन ऐकून । मुदित झाले नाग ऋषिगण । तैसेचि सर्व देवगण । प्रणाम करून पूजिती त्यांसी ।।१।। आपुलें मत त्यागून । ॐकारादीस म्हणती कर जोडून । आपण सांगितलें जें वचन । तें सर्व मान्य ब्रह्मभूयप्रद ।।२।। वेद सर्वांचें गुरु ख्यात । त्यांनी सांगितले तें करणें उचित । तेंच गतिप्रद सर्वसंमत । वेदाधारविहीन त्याज्य ।।३।। जो वेदवचन न मानित । त्यासम आचरण न करित । तो नरकलोकीं जात । यातना भोगी बहु तेथे ।।४।। आतां तुम्ही समस्त । देवनायक मुनि जनसंघासहित । ब्रह्मयज्ञाच्या पार निश्चित । जाणार हें असे ।।५।। देवही ऐसे बोलती । महाभाग

ते वेद मुख्यांस स्तविती । तेव्हां ते हर्षित होती । ॐकारासहित चार वेद ।।६।। महाभाग देव त्यांसी पूजिती । नंतर वेद ॐकारासह अंतर्धान पावती । आपापल्या स्थानीं परतती । ब्रह्मयज्ञ पूर्ण करिती सारे ।।७।। ऐशापरी हे साध्य होत । ब्रह्मयज्ञाची पूर्ती पुनीत । संशय सोडून सारे भजत । ते सारे गणनायकासी ।।८।। हें सारें योगशांतिप्रद । रहस्य कथिलें तुज सुखद । सर्वमान्य मुक्तिप्रद । आतां तूही भज गणनायकासी ।।९।। सुबोध कथा पुढती सांगत । ऐसे सांगून शुकाचार्य अंतर्हित । झाले परी प्रल्हाद भक्तियुक्त । भजे तया गणनायकासी ।।१०।। मातेच्या उदरांत ऐकलें । जें रहस्य मी गर्भरूपीं चिंतिलें । विशेषानें जतन केलें । तेंच मज योगदायक ।।११।। पूर्व पुण्याच्या बळें स्मृती । माझ्या या जन्मीं होती । जागृती ह्यास्तव मी जन्मापासून चित्तीं । भजतों तया गणनायका ।।१२।। गुरुदेवांनो मी सांगितलें । आपल्या प्रश्नाचें उत्तर भलें । जें जें मज आठवलें । शिकवूं नका मज मोहविद्या ।।१३।। श्रीकृष्ण म्हणती सुबोधाचे वचन । ऐकून हर्षयुक्त विप्रजन । म्हणती त्यासी भावज्ञ । भावसिद्धिस्तव ऐसे ।।१४।। सुबोधा जें तूं कथिलेस । तें अन्यथा न वाटे चित्तास । परी तूं वत्सा ऐकविलेंस । हितकारक वचन उत्तम ।।१५।। तुझे पितामह महाभाग । दुर्बुद्धी ते महासुर सुभग । त्यांसी गणेश हस्ते मृत्युयोग । ओढवला भूतकाळी ।।१६।। गणेशानें देवपक्ष घेऊन । केलें त्याचें तदा हनन । म्हणून पितृवत्सल तव जनक । द्वेष करी गणेशाचा ।।१७।। जो तुझ्या पित्याचा द्रोही । त्यासी त्यागावें तूही प्रत्यही । नाही तर ठार मारील पाही । पिता तुजसी निःसंशय ।।१८।। महामते म्हणोनि दुराग्रह । करूं नको तूं ऐसा निग्रह । असुर कुळांत हितावह । जन्म झाला तुझा असे ।।१९।। तरी तू आपुले कुळाचार । पालन करी बुद्धिपुरस्सर । हे त्यांचे ऐकून उद्गार । सुबोध

बहु क्रुद्ध झाला ।।२०।। त्याचे नयन आरक्त झाले । तो त्वेषानें द्विजांसी बोले । धर्मसंयुत जें वचन असलें । अशक्य त्या बाल्यांत ।।२१।। म्हणे सर्वत्र गणेश वसत । योगरूपें द्विजानों जगांत । स्वस्वधर्माचा नियंता असत । नाना क्रीडापरायण ।।२२।। स्वर्गांत देव पृथ्वीवरी नर । पाताळांत स्थापिले त्यानें असुर । आपापल्या मार्गांत रहावें स्थिर । हितेच्छूंनी सर्वदा ।।२३।। माझ्या पितामहें राज्य केलें । त्रैलोक्याचें जरी तें झालें । धर्महीनतेनें दूषण असले । म्हणोनि वधिले गणेशें तया ।।२४।। तैसाचि माझा पिता जगांत । धर्म सोडून वागत । त्यासही मारील त्वरित । गणेश यांत संशय नसे ।।२५।। आतां सांगा मजप्रत । गणराजें काय केलें विपरीत । स्वधर्म त्यासी प्रिय बहुत । सर्वांचा हितकर्ता तो ।।२६।। विघ्नराज तो संशयातीत । त्यासीच मी भजेन निश्चित । वडिलांसहित त्यागीन जगांत । दुष्टवृत्ती जे असती ।।२७।। जरी मज गणेशभजनीं मग्न असतां । मारील तो तें तत्त्वता । ब्रह्मप्रद होईल मरण सर्वथा । आपण चिंता करूं नका ।।२८।। माशांचा त्रास बहु होत । तैसेचि डास घोंघावत । म्हणोनी कोणी का घर त्यागित । सांगा पंडित विप्रांनो ।।२९।। बुद्धिपति गणेशाची सत्ता । सर्वत्र चालते ही महत्ता । त्या सिद्धिपतीची हानि तत्त्वता । काय करील माझा पिता? ।।३०।। गणेशभजन हाच स्वधर्म । सर्व भूतांस पुरुषार्थप्रद अनुपम । ब्रह्मलाभार्थ मनोरम । तोचि तुम्हीं आचरावा ।।३१।। आपण ब्राह्मण न राहिलात । विषयपरायण तुम्ही समस्त । धर्म सोडून वास केलात । दैत्याधीन येथ होऊनियां ।।३२।। जे गणेशाच्या भजनीं आसक्त । ब्रह्मपरायण पुनीत । तेच ब्राह्मण सत्यार्थे जगांत । काय बालिश अन्य सांगता ।।३३।। शुक्रशिष्यांस ऐसें सांगून । सुबोध करी गणेशाचें भजन । एकनिष्ठ त्याचे मन । तत्पर गणेशभक्तींत तो

।।३४।। नमन गणेशासी महात्म्यासी । परेशासी परात्परासी । अनादिमध्यांतमयासी । ढुंढे तुजसी नमस्कार ।।३५।। विघ्नपते तुज वंदन । सुशांतिप्रदा तुज नमन । ऐसा विवाद घाली म्हणून । भयभीत झाले असुरगण ।।३६।। ते शुक्राचार्यांचें शिष्य चित्तांत । जाहले बहुत चिंतायुक्त । ज्ञानारीस सांगण्या जात । राजपुत्राचा हा वृत्तान्त ।।३७।। ओमिती श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते शुक्रशिष्यसुबोधसंवादो नामाष्टचत्वारिंशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अठ्ठेचाळिसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्ण युधिष्ठिरासी सांगती । शुक्रशिष्य ते तेथ जाती । जेथ दैत्याधिपतीची वसती । भयसमन्वित तदनंतर ।।१।। ज्ञानारी बैसला होता सभेंत । शुक्रशिष्य त्यास सांगत । म्हणती वृत्तान्त विपरीत । ऐक दैत्येंद्रा क्षमा करी ।।२।। तुझा पुत्र मदोन्मत्त । आमुची उपेक्षा सदा करित । आमुच्या वचनाचें उल्लंघन सतत । जातिदूषण तो करीतसे ।।३।। आपुल्या मनाचें करित । अन्यांसही तैसेंच शिकवीत । पितृहत्याऱ्यास सदा स्मरत । भक्तिपूर्वक सर्वकाळ ।।४।। आमचा तिरस्कार करित । तुलाही तो न मानित । म्हणोनि सांगण्या आलों वृत्तान्त । शिकव तुझ्या तूं पुत्रास ।।५।। त्या अविनीता शिकविणें । तें आम्हां न जमणें । त्यांचें हें वचन ऐकून म्हणे । प्रक्षुब्ध दैत्यनायक तो ।।६।। त्वरित पाठवा दूत । पकडून आणा माझा सुत । राजाज्ञेचें पालन होत । सत्वरी पुत्रा आणिती ।।७।। त्या सुताचें होता आगमन । महासुर स्वीकारी त्याचें वन्दन । क्रोधयुक्त परी त्याचें मन । महासुर ज्ञानारी म्हणे तयासी ।।८।। अरे कुलकलंका तिरस्कारून । गुरूंसी

कोणाचें करतोस स्मरण । तुझ्या हृदयांत काय दारुण । अहित भरलें तें सांग ।।९।। पित्याचें वचन ऐकत । सुबोध म्हणे क्रोधयुक्त । गणेशमायेनें जो भ्रांत । ऐशा स्वजनका तो सांगे ।।१०।। तात मी गणनायका भजतों । जो सर्वांचा कुलदेव नांदतो । सर्वांचे हित सदैव करतो । भुक्तिमुक्ती त्यांस देई ।।११।। ब्रह्मा विष्णू आदि देव । कश्यपादी मुनी पूजिती सदैव । कुलवृद्ध्यर्थ योगशांतिभाव । प्राप्त व्हावा म्हणोनी ।।१२।। कश्यपापासून आपण उत्पन्न ।। देव दैत्य तसे विविध जन । त्या सर्व प्राण्यांचा स्वामी गजानन । म्हणोनि भजतो तयासी ।।१३।। त्याचा अनादर जो करी । त्यास सिद्धी होती दुरी । सर्वभावें पूजन करी । त्यास लाभती सकलार्थ ।।१४।। त्याचें तें वचन ऐकून । क्रोधयुक्त बोले वचन । महाअसुर तो आग ओकी दारुण । मुखांतून त्या वेळीं ।।१५।। त्या धर्मराजास स्वपुत्रास । म्हणे ज्ञानारी वचनास । आमुचे शत्रू देव विशेष । दैत्यांस असे हा अनुभव ।।१६।। सुर असुरांचा हा भेद सांगत । वेद प्रत्यक्ष जगांत । यांत संशय अल्प नसत । त्यांतून हा मम पितृहन्ता ।।१७।। त्यासीच वृथा तूं भजत । बाल्यापासून हें मी जाणत । तूं आहेस रिपूच आश्रित । परी दुष्टा मी दुर्लक्षिलें ।।१८।। बाळ म्हणोनी न मारिलें । शठा माझें हृदय द्रवलें । कृपेनें जरी त्या वेळे । आता न सोडीन तुजला मी ।।१९।। सांप्रत तैसा विचार सोडून । तुजसी करीन शासन । अन्यथा शत्रूचा पक्ष दे सोडून । महामूर्खा सुबोधा ।।२०।। नाहींतर मी तुज मारीन । परी सुबोध कांहीं न बोले वचन । तेव्हां आपुलें खड्ग उगारून । धावला तो तनयावरी ।।२१।। दैत्यराजास तो पुत्र म्हणत । ताता व्यर्थ कां तूं शिणत । मज कां ऐसा धाक दावित । भ्रांतिभावें मोहित तूं? ।।२२।। सर्वसत्ताधारी ख्यात । गणनायक देवांत । त्याची सत्ता अवहेलून जगांत ।

मज काय तूं मारणार ।।२३।। सुरअसुरमय वर्तत । गणेश प्रभु हा साक्षात । जे असेल जगीं उद्धत । त्यास मारी तो वेगानें ।।२४।। नानारूपधारी जो असत । ऐसें जेव्हां बोले सुत । भयहीन तैं क्रोधयुक्त । जाहला बहु दैत्यराज ।।२५।। दूतांसी आज्ञा देत । शस्त्रास्त्रांनी मारा त्वरित । या सुताचा वध करा तुम्ही समस्त । दैत्यगण तें ऐकती ।।२६।। ते सर्व अत्यंत क्रोधयुक्त । नाना प्रचंड नाद करित । नग्नशस्त्रधर धावत । सुबोधासी मारावया ।।२७।। परी सुबोध होता भयहीन । गणेशाचें करी भजन । जराही न हाले आसनापासून । होणार तें होवो म्हणे ।।२८।। देहप्रारब्धभावें गजानना । ज्या होणार मज यातना । विघ्नेशा हेरंबा पावना । त्या सर्व मी सहन करीन ।।२९।। जय अखिलेशा स्वानंदनिवासा । वक्रतुंडा ढुंढे सुखवासा । लंबोदरा ब्रह्मसुता तुजसा । अन्य कोणी नाथ नसे ।।३०।। ऐशा विविध वाक्यांनी स्तवित । जेव्हां तो असुरसुत । ते क्रोधांध दैत्य त्यास मारित । नाना शस्त्राघातांनी ।।३१।। देहावरी सर्वत्र हाणिती । परी त्यास न होय कांहीं क्षती । त्याच्या देहस्थ गणपति । निष्फल करी शस्त्रास्त्रें ।।३२।। तो विघ्नप सर्वांस जाळित । क्रोधाग्नीनें त्या सर्व दैत्यांप्रत । तेव्हां ते प्राण वाचविण्या करित । दैत्यवीर पलायन ।।३३।। ते परम आश्चर्य पाहून । ज्ञानारी क्रोधें मूर्च्छित होऊन । श्रेष्ठास नंतर आज्ञापी उन्मन । वध करण्यास स्वपुत्राचा ।।३४।। चतुरंग बळानें युक्त । दैत्येश वीर तेव्हां हल्ला करित । अमोघ अस्त्रांनी मारण्या उद्यत । सुबोधासी ते परम दारुण ।।३५।। गणेशभक्ती तथापि करित । जयजयकार विघ्नेशाचा उच्चारित । महोदरासी तो नमित । तेव्हां आश्चर्य एक घडलें ।।३६।। त्याच्या देहांतून महा अग्नी प्रकटून । दैत्येशांचें करी दहन । मेघास्त्रें झणी सोडून । शांत करण्या बघती ते ।।३७।। परी तो प्रलयाग्नीसम जाळित । त्या सकळांस

न शमत । असुरांचे नायक मरत । समस्त त्या अग्नितेजीं ।।३८।। ज्ञानारी परम आश्चर्ययुक्त । तैसाचि झाला खेदसंयुत । प्रधानांचा सल्ला घेत । तत्क्षणीं त्यागी पुत्रासी ।।३९।। शुक्र होता मग्न तपांत । हें जाणून क्रोध आवरित । मेधावी ते चित्तीं म्हणत । शुक्र येतां पुढे बघू ।।४०।। शुक्राचार्याची तपस्या संपेल । तैं ते राजसदनीं येतील । त्याच्यासह मारावा हा बाळ । कुलघातक भयंकर ।।४१ ।। ऐसा विचार करून निश्चित । त्या क्षणीं ते माघार घेत । दैत्यनायक समस्त । ज्ञानारीनें तें मान्य केलें ।।४२।। हृदयीं तो दु:खित झाला । परी अन्य उपाय नव्हता उरला । सुबोध करितचि राहिला । गणपाचें नित्य भजन ।।४३।। अनन्यमानस निर्भय । सर्व दानव तृणासम मानी ज्ञानमय । दैत्यपुत्रांस युधिष्ठिरा, भक्तिमय । गणेशभजन तो शिकवी ।।४४।। गणेश माहात्म्य हे सत्य असत । तिळमात्र संशय नसे यांत । अनेक दैत्यभूपाल मेले क्षणांत । सुबोधाचा विरोध करती ।।४५।। ऐसा विचार करून अन्य दैत्यसुत । विघ्नेशास आदरें भजत । सर्वभावें तिरस्कारित । असुरगुरूंच्या सुतांसी ।।४६।। सुबोध समन्वय करित । तें दैत्य पुत्र सर्वत्र आचरित । जिथें तिथें कीर्तन अर्चनांत । मग्न ते सर्व जाहले ।।४७।। नमो विघ्नपती गणेशा । स्वसंवेद्य पुरनिवासा । अनादि मध्यांतहीना ईशा । सुशांतिप्रदा सर्वपूज्या ।।४८।। ऐसें दृश्य सर्वत्र पाहून । ज्ञानारीचा क्रोध वाढून । त्यासी तो सहन न होऊन । स्वपुत्रवधाचा निश्चय करी ।।४९।। मजला वरदान उत्तम असत । म्हणोनी मृत्युचें भय नसत । तरी मीं मारीन दुष्ट सुत । ऐसा निश्चय दृढ केला ।।५०।। ओमिती श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते सुबोधभक्तिवर्णनं नामैकोनपंचाशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकोणपन्नासांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्ण म्हणती युधिष्ठिरा । आतां ऐक सत्य धुरंधरा । देवादींची वनांतील तऱ्हा । पूर्णानंदाचें कार्यही ।।१।। पूर्णानंद प्रतापवन्त । विष्णुमुख्य सुरांस म्हणत । आपण सारे दुःखयुक्त चित्त । कोणत्या कारणें जाहलात? ।।२।। ज्ञानारीनें जग समस्त । स्थावर जंगम दुःखयुक्त । केलें तया वधीन मी निश्चित । आता दुर्लभ काय तुम्हां ।।३।। मी पुत्रत्व पावलों । विष्णुदेवा प्रसन्न अवतरलों । आता संरक्षणपर झालों । परत जा तुम्ही वैकुंठी ।।४।। ज्ञानारी पुत्रनाशास्तव उद्युक्त । माझा तो असुरसुत महाभक्त । भक्तरक्षणार्थ त्वरित । स्वयं जाईन मी आतां ।।५।। त्या दुष्ट ज्ञानारीस मारून । स्वभक्तांस सुख देईन । भय नसे चराचरापासून । म्हणोनि गर्व त्यास वाटे ।।६।। चराचरमय तें त्रैगुण्य असत । हें असे संशयातीत । म्हणून द्वंद्वविहीन रूप घेत । महाअसुरासी मारावया ।।७।। आता स्वभक्तासाठी करीन । तें पहा कुतूहल महान । तिकडे ज्ञानारी खड्ग घेऊन । सुबोधा मारण्या धावला ।।८।। क्रोधें संतप्त ज्ञानारीस पाहत । सुबोध परी होता शांत । तो गणेशभक्तिसंयुत । सांगे आपुल्या पित्यासी ।।९।। ताता आपण अहंकारयुक्त । मायेच्या प्रभावी बुडालांत । म्हणून न जाणता चित्तांत । संस्थित त्या गणेशाला ।।१०।। वेदवादि मतानुसार । चिंतामणि असे हा थोर । वेदांचें वचन प्रत्यक्ष अर्थपर । शरण त्यास जा तुम्हीं ।।११।। अन्यथा आपुलें मरण । ओढवेल सुदारुण । तुमच्या भयें न सोडीन । कदापि मी विघ्ननायकासी ।।१२।। तरी मूढपणें का वृथा श्रमतां । त्या सत्ताधाऱ्यास कां न पाहतां । ऐसें त्यास पुत्रें विचारितां । मारी तीक्ष्ण खड्ग तया ।।१३।। तें खड्ग तीक्ष्णधार । परी सुबोधास ना वाटलें उग्र । त्याचें शरीर समग्र । निरबाध सुरक्षित ।।१४।। तेव्हां नाना अस्त्रांचा वर्षाव । करी ज्ञानारी परी न पाडाव । होई सुबोधाचा सद्भाव ।

निष्फल सारीं शस्त्रास्त्रें ।।१५।। अग्न्यस्त्रादि निष्फल होत । असुरेंद्र तें पाहत । आश्चर्यचकित जाहला मनांत । तदनंतर करी मल्लयुद्ध ।।१६।। पाय पकडून पुत्राचे त्या फिरवित । शिलेवरी त्वेषानें आपटित। तेव्हा स्वयेंचि पडत मूर्च्छित । मार बहू त्यास लागे ।।१७।। अदृश्यभावें त्यास हाणित । विघ्नविनाश देव क्षणांत । पुन्हां जाग येतां पाहत । ज्ञानारी आपुल्या पुत्रास ।।१८।। गणेशभजनांत तो रत । पाहून दुर्मती त्याचा तात। विचार करी स्वचित्तांत । परम अद्भुत काय हें ।।१९।। मज कोण हा मारित । पाहूं न शके त्या महारिपूस जगांत । ह्या कुलांतकाचा अंत । स्वपुत्राचा कैसा करूं मी? ।।२०।। पुत्राच्या मरणासाठीं सतत । विविध प्रयत्न मीं करित । त्यासाठीं नाशिले दैत्यनाथ अमित । मित्रस्नेही अगणित तैसे ।।२१।। एक मीं तरी मरेन । अथवा ह्या पुत्रास मारीन । काय करावें व्याकुल मन । ऐसें त्याचें जाहलें ।।२२।। तत्क्षणीं त्यास विशेष ज्ञान । स्फुरलें वधार्थ महान । पुत्राचा रक्षक जो कोणी महान । प्रथम त्यासी मारावें ।।२३।। नंतर मारावें सुतासी । रक्षक मरतां तयासी । पुत्रासी कोण रक्षील अंत्यक्षणासी । ऐसा संकल्प करी तो ।।२४।। नंतर म्हणे क्रोधसंयुत । पुत्रासी तो मोहमोहित । असुर सुबोधा संबोधित । कुठे तुझा तो रक्षक? ।।२५।। त्या महादुष्टा घेऊन येई । शठा मग पराक्रम माझा पाही । त्यास मोहमग्न पाहून सुतही । कारुण्यपूर्ण वचन सांगे ।।२६।। ताता पहा आपुल्या हृदयांत । चित्तवृत्तिपालक तो अद्भुत । वैरभाव सोडून शरणागत । अहंकार सोडून व्हा त्याचे ।।२७।। तरी ब्रह्मभूत व्हाल । सर्वत्र संस्थित त्यास पहाल । त्या स्वामी गजानना अमल । भावभक्तीनें जगांत ।।२८।। परी जरी त्यास मारण्या उद्यत । झालात तरी मृत्यु क्षणांत । येईल तुम्हा संशयातीत । सत्य जाणा हें ताता ।।२९।। तेव्हां पुनरपि त्यास म्हणत ।

महाभागा तो दाखवी मजप्रत । मी भजीन त्यास निश्चित । ऐसें कपटनाटक करी ।।३०।। सुबोध ते जाणत । पित्यास्तव गणेशास स्मरत । तेव्हां मूषकारूढ येत । विष्णुपुत्र त्या जवळीं ।।३१।। देव द्विज भयभीत । त्याच्या मागून सर्व येत । गुप्तरूपें आकाशांत । राहून आश्चर्य पाहती ।।३२।। सुबोधासमीप जो संस्थित । त्या गणनायका पाहून संतप्त । महादुष्ट ज्ञानारी विचार करीत । वधोपाय मानसीं ।।३३।। परी सुबोध प्रणाम करून । विविध स्तोत्रें करी गायन । तो योगी बोले पित्यास वचन । पहा आतां हा गजानन ।।३४।। सुबोधाचे वचन ऐकत । तेव्हा तो असुर क्रोधयुक्त । अमोघ सर्वसंहारक अस्त्र उगारित । तत्क्षणीं तो गणेशावरी ।।३५।। परी मध्यंतरी पूर्णानंद काय करित । जो होता ज्ञानारीच्या हृदयांत । त्या दैत्याचा जीवभाव आकर्षून घेत । युधिष्ठिरा लीलया तो ।।३६।। एक निमिषार्धात पडत । भूमीवरी तो चैतन्यें त्यक्त । हाहा:कार दैत्यगण करित । पाताळ लोकीं ते पळाले ।।३७।। नंतर नभस्थ देव विप्रादि प्रकटत । पूर्णानंदासी प्रणाम करित । भक्तिभावें स्तवन करित । गणेश्वराचें त्या वेळीं ।।३८।। ते स्तवन करीत असत । तेव्हां त्यांच्या समोरून क्षणांत । सुबोधास घेऊन अंतर्हित । जाहले गणेश पूर्णानंद ।।३९।। ते सर्व झाले खिन्न । लक्ष्मीनारायण मूर्च्छित उन्मन । धरणीतलावर कोसळून । वियोग दु:खें विलाप करिती ।।४०।। पुत्रविरहें व्याकुळ होत । परी एक दोन मुहूर्तांत । त्यांच्या हृदयीं प्रकटत । म्हणे माता पित्यासी तो ।।४१।। मी मूर्तिमंत अन्त:करणांत । तुमच्या सदैव आहे रहात । माझा वियोग कदापि न घडत । विचार करा हा मानसीं ।।४२।। ऐसें बोलून बुद्धिचालक होत । अन्तर्धान एका क्षणांत । तेव्हां लक्ष्मीनारायण घडवित । मूर्ति त्या गणेशाची ।।४३।। ह्या मूर्तीच्या भक्तींत । सदैव भजनीं निमग्न होत । आपुलें दु:ख विसरत ।

स्वपुत्रविरहाचें महान ।।४४।। ऐशापरी हा महोदर । सर्व प्रदाता उदार । प्रतापवंत हर्ता ब्रह्मभूयकर । ब्रह्मभूयप्रद तो ।।४५।। शिव विष्णु आदी देव सेविती । भक्तिभावें मुनिगण जगतीं । योगीजन नाना प्राणी पूजिती । एकभावें तयासी ।।४६।। महीपाला त्यास भजशील । तरी विघ्नहीन तूं होशील । स्वधर्मी राहून निर्मल । शांतियोग लाभशील ।।४७।। ऐसें नारायण सांगत । युधिष्ठिर तेव्हां प्रेमयुक्त । महामती धर्मपालका म्हणत । कृष्णा ब्रह्मप्रदायिनी ।।४८।। महाप्राज्ञा सांगितली मजप्रत । जी कथा सर्व कामप्रद असत । परिपूर्ण ती ऐकून चित्त । संतुष्ट झालें निःसंशय ।।४९।। तुझ्या संगयोगें ज्ञात । गजानन जाहला मजप्रत । त्याचा मंत्र सांग पुनीत । स्त्रीबांधवांसहित मजला ।।५०।। तेव्हां तो देवकीपुत्र देत । षडक्षर गणेशमंत्र अद्भुत । देवेश धौम्यमुखें तयांप्रत । समस्तांसी आदरें ।।५१।। मुद्गल म्हणती दक्षाप्रत । पांडव तैं द्रौपदीसहित । त्या मंत्राच्या जपें भजत । विघ्नपासी भक्तिभावें ।।५२।। चतुर्थीचें व्रत करित । तेव्हां ते जाहले दुःखमुक्त । सूर्यापासून एक थाळी लाभत । अन्नदायक ते ताट ।।५३।। त्यामुळें विविध अन्न प्राप्त । बांधवा तेणे संवर्धित । दुःखहीन होऊन वनांत । भ्रमण करीत ते होते ।।५४।। व्यास वासुदेवांसमवेत । ते संचार करिती स्वानंदपुरांत । मयुरेशास तेथे पूजित । भक्तियुक्त ते सारे ।।५५।। पांडवेशाची स्थापना करून । पित्याचें श्राद्धादि व्रत पावन । तोषविती स्वपितरांसी प्रसन्न । थोर महिमा त्या स्थळाचा ।।५६।। स्वानंदपुरांत पिंडदान । करितां पांडूस तत्क्षण । जाती सारे गणेशगण । आणण्या मित्रस्नेह्यांसह ।।५७।। गणेशविमानाने स्वानंदांत । ब्रह्मरूपी त्यास नेत । नंतर क्षेत्रज महिम्याने होत । पांडूचा निवास गणेशलोकीं ।।५८।। नंतर एक वर्ष निर्विघ्न निवसत । पुढें सस्त्रीक प्रकट होत । पांडव पूर्ण करिती अज्ञातवास ।

युद्ध तदनंतर घोर करिती ।।५९।। महाभारतीय युद्धांत । दुर्योधनादी वीरांस मारित । सैन्यासह कर्णादीस वधित । अंती राज्यलाभ झाला ।।६०।। राज्य पुनरपि लाभत । तेव्हांही गणेशासी भजत । सर्वनायका अविरत । पांडव सारे द्रौपदीसह ।।६१।। ऐशापरी युधिष्ठिर । आराधी नित्य महोदर । मोहशून्य स्वभावें उदार । योगी तो शांतिधारक ।।६२।। पूर्णानंदाचा अवतार । अंतर्गत जेथ महोदर । ऐशापरी नाना अवतार । घेऊन क्रीडा दाखवी ।।६३।। त्या अवतारांचें वर्णन । करण्यास अशक्य असून । अयुत वर्षें केलें कथन । तरी पुण्यचरित अवर्णनीय हे ।।६४।। हें युधिष्ठिराचें चरित । पापनाशक पुनीत । वाचका पाठकासी जगांत । सर्व अर्थप्रद होईल ।।६५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते युधिष्ठिरचरितं नाम पंचाशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पन्नासांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मुद्गल सांगती दक्षाप्रत । महोदराचें क्षेत्र स्थित । तें दक्षिण दिशेंत । तेथ स्थापिती गणेशमूर्ति ।।१।। दहा योजनें विस्तार । ऐसें मानदा तें क्षेत्र । चतुरस्त्रांत महोदर । स्थापिती देवमुनी तेथ ।।२।। पूर्वी जो आपापल्या खंडात । द्वीपांत सर्वत्र स्थापिला असत । दक्षिण दिशेत विराजत । त्या वेळीं तो ब्रह्ममय ।।३।। त्या क्षेत्रीं देवऋषि वसत । योगी तीर्थक्षेत्रें अगणित । आपुल्या तीर्थांत स्नान करित । समुद्रस्नान फळ त्यांसी ।।४।। आणि ते ऐसें तीर्थस्नान करून । गणेशाचें करिती भजन । परस्परांचे हित रक्षून । महोदरचरित्र सदा स्मरती ।।५।। त्याचीं विविध कार्ये स्मरती । रोमांचित शरीरें होतीं । सिद्धिबुद्धिसहित भजती । मूषकवाहन ज्यासमोर ।।६।। दूर्वादींच्या उपचारें पूजन । भाद्रपद चतुर्थी

उत्सव महान । प्रतिवर्षी करिति प्रसन्न । अनेक भक्त यात्रा करिती ।।७।। तेथ महोदराच्या दर्शनें लाभतीं । मानव ईप्सित जें चित्तीं । स्मरणमात्रेंही मुक्त होती । सर्वार्थांनी ते सदा ।।८।। क्षेत्रांत येतां मरण । ब्रह्मभूतत्व पावे जाण । नर तैं मुक्त होऊन । गणेश सायुज्य लाभतो ।।९।। अष्ट विनायक प्रख्यात । त्यांचीं क्षेत्रें पुनीत । ब्रह्मभूतमय असत । शिवादी देव तेथें ।।१०।। भक्तिकार्यार्थ तेथ निवसती । शेषादी जे श्रेष्ठ जगती । ते सर्व क्षेत्रांत राहती । या अष्टविनायकांच्या ।।११।। तेथ गणेशतीर्थ अद्भुत । महोदराचें प्रिय असत । त्यांत स्नानमात्रें होत । मानव सर्वसिद्धियुक्त ।।१२।। विष्णुआदिक अन्यतीर्थांत । गाणेशक्षेत्री जीं असत । त्यांत स्नान करता लाभत । इच्छितार्थ प्राणिजात ।।१३।। त्या त्या पदाचा लाभ घेत । अन्तीं ब्रह्मभूत ते होत । स्वानंदीं वास करित । यांत संशय कांही नसे ।।१४।। अन्य देवांचे जे भक्त । ते जरी मरण पावती या क्षेत्रांत । आपापल्या देवलोकांत । जातात ते भक्तिभावें ।।१५।। महालयीं तीन देव । लय पावती सर्व । तरी ते निजलोकीं अभिनव । सुखप्रदांत जातील ।।१६।। गणेशक्षेत्रीं मरणसंस्कार । होता उद्धार पावतील नर । ब्रह्मभूत ते उदार । पावन जाणावे जगीं ।।१७।। म्हणोनि भक्तीनें सेवावें । गणेशक्षेत्रासी जावें । कोठे अन्यत्र भजती स्वभावें । तेही होती ब्रह्मभूत ।।१८।। पावन ते लोकांसी होत । शिवादींचें भजन करित । तै जन्मजन्मांतर जाता होत । त्या संस्कारें ते गणेशयुक्त ।।१९।। गणेशाहून न परब्रह्म भिन्न । सर्वसंमत तें सुखनिधान । म्हणून जे गणेशभक्त ते महान । ब्रह्मभूत ऐसी ख्याती ।।२०।। हे महोदर आख्यान । सर्वसिद्धिप्रद पावन । यथामति कथिलें दक्षा जाण । म्हणे मुद्गल महामुनि ।।२१।। संक्षेपानें सांगितलें । तें आज पूर्ण झालें । ऐकेल वाचील भावबळें । त्यास

अन्तीं ब्रह्मपद ।।२२।। ह्यासम नसे त्रैलोक्यांत । अनुपम अतुल हें असत। सर्वअर्थप्रद मानवाप्रत । ब्रह्मादिदेवांस योगिया ।।२३।। नाना व्रतें विधि अनुसार । करण्याचें फळ पावें नर । ह्या चरित्राच्या वाचनें सत्वर । नाना तीर्थस्नान पुण्य ।।२४।। तीर्थक्षेत्रीं करिती तर्पण । तैसेचि देवतापूजन । यथाशास्त्र त्याचें फळ पावन । तें लाभतें श्रवणें याच्या ।।२५।। अन्य क्षेत्रांत भक्तियुक्त । जो नर निवास करित । विधिपूर्वक तो जें लाभत । तें फळ या चरित्रवाचनानें ।।२६।। नानाविध यज्ञें जें लाभत । देवांचें दर्शन घडता होत । तें सर्वही फळ लाभत । या महोदरचरित्रश्रवणें ।।२७।। इष्टापूर्तादिक कर्में करित । नरोत्तम जें पुण्य करी प्राप्त । ते सर्व होत प्राप्त । या चरित्राच्या वाचनानें ।।२८।। काय सांगावें बहुत । ब्रह्मभूयप्रद तो होत । या चरित्राचें श्रवण करी जगांत । धर्म अर्थ काम मोक्षद ।।२९।। पुत्रपौत्रादिक सर्व धन । धान्य विविध राज्यादि लाभून । अश्वादिक वाहनें महान । सर्व लाभतें श्रवणानें ।।३०।। महोदराचें माहात्म्य जेथ गृहांत । भक्तिभावें लेखन होत । तेथ राक्षसादींचें भय नसत । चोरादींचें अग्नीचें ।।३१।। ग्रहरोगादिक पीडा जात । या पुस्तकांच्या पूजनें निश्चित । दक्षा यांत संशय नसत । सत्य हें भक्त अनुभविती ।।३२।। जें जें इच्छिती प्राणिमात्र मनांत । हे चरित्र जेव्हां ऐकत । तें तें महोदर देत सुप्रीत । प्रतापवंत भक्तांसी ।।३३।। वाचकांस संतुष्ट करित । तरी तत्क्षणीं फल लाभत । गणेशासन्निध श्रवण करित । तरी पतित उद्धरती ।।३४।। भावसंयुक्त जे असती । ते ब्रह्मभूत होती । यासम ब्रह्मलोकांत नसती । अन्य ग्रंथ कोठेही ।।३५।। ज्यांत महोदर साक्षात । योगपती असे वर्णित । ऐसे हें महान चरित । कथिलें तुज संक्षेपानें ।।३६।। महोदराचें महिमान । ऐकून तृप्त होऊन । काय ऐकण्या इच्छी तव मन । सांग मजला

दक्षा तूं ।।३७।। सूत सांगे शौनकादिकांप्रत । ऐसें बोलून मुद्गल थांबत । मीही सांगितलें तुम्हांप्रत । असामान्य हें चरित्र ।।३८।। सर्वमान्य विशेषयुत । वेदादींचें सार प्रख्यात । नानाशास्त्रें घुसळून काढित । पुराणें हीं येथून ।।३९।। व्यास जें सार उत्तम । सांगती पूर्वी मनोरम । ब्रह्मप्रद तें तुम्हां अनुपम । कथिलें मी यथामती ।।४०।। गणेशाहून पर ब्रह्म नसत । गणेशाहून न अन्य तप पुनीत । गणेशावाचून कर्म ज्ञान नसत । कांही नसे गणेशावाचून ।।४१।। गणेशास एकास त्यागून । जो नर अन्य कर्मपरायण । त्याला सर्व ब्रह्मज्ञान । प्राप्त होऊनही निष्फळ ।।४२।। सिद्धिपतीस सोडून । सिद्धि शाश्वत इच्छी जन । तरी तो स्वभावें फलहीन । होऊन जाय नरकांत ।।४३।। बुद्धिपतीस त्यागून । स्थिर बुद्धी इच्छी जीवन । तो योग न लाभत महान । भस्मांत जणू त्या आहुती ।।४४।। सर्वपूज्य हा एक असत । गणेश सर्वादी सर्वपावन जगांत । त्यास भजा विशेषयुक्त । वेदादींस जो संमत ।।४५।। हें सर्व सार तुज कथिलें । महोदर कथानकरूपें भलें । आतां चित्त काय ऐकण्या झाले । आतुर सांग शौनका ।।४६।। ऐसें हें महोदरचरित । सूतें कथिलें शौनकाप्रत । गणेशगुरुकृपेनें प्राकृतांत । अनुवाद करुन त्यास अर्पिलें ।।४७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते श्रवणफलवर्णनं नामैकपंचाशत्तमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकावन्नांवा संपूर्ण)

।। इति श्रीमुद्गलपुराणे तृतीयः खंडः समाप्तः ।।

